# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### मुंबई महानगर परिक्षेत्रातील मुख्य महामार्गावर लावण्यात आलेल्या दिशा दर्शक फलकांचा उपयोग नियमबाह्यपणे जाहिरातीसाठी करण्यात येत असल्याबाबत

**(१) ४३९७२ (०१-११-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.अनिकेत तटकरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगर परिक्षेत्रातील मुख्य महामार्गावर लावण्यात आलेल्या दिशादर्शक फलकांचा उपयोग नियमबाह्यरित्या जाहिरातीसाठी करण्यात येत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर जाहिरातींमध्ये बझ सोल्युशन, ग्लोबल आऊटडोअर अशा कंपन्यांची नावे लिहून संपर्क क्रमांक देण्यात येत असून उक्त कंपन्यांनी संबंधित यंत्रणेची परवानगी घेवून निविदा प्रक्रिया राबविली नसल्याचे ही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी एम.एम.आर.डी.ए., मनपा तसेच सार्वजनिक बांधकाम विभागामधील अधिकाऱ्यांनी संबंधितांविरुध्द कोणतीही कार्यवाही केली नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने संबंधित कंपन्यांवर गुन्हे दाखल करुन दोषी अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या अखत्यारीतील अंधेरी कुर्ला रोड जंक्शन ते दहिसर दरम्यानच्या महामार्गावरील दिशादर्शक फलकांच्या मागील बाजूस वेळोवेळी अनधिकृत जाहिराती आढळून येत असतात. सदर अनधिकृत जाहिराती प्राधिकरणामार्फत निष्कासित करण्याचा कार्यक्रम घेऊन काढण्यात येतात. तसेच भविष्यात अशा अनधिकृत जाहिराती दिशादर्शक फलकांवर लावण्यापासून प्रतिबंध करण्यासाठी स्थानिक पोलीस विभागासमवेत कारवाई करण्याचे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या स्तरावर नियोजित आहे.

(२) बझ सोल्युशन ग्लोबल आऊटडोअर अशा कंपन्याची जाहिराती आढळून आलेल्या नाहीत.

(३), (४) व (५) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत कक्ष अधिक्षक परवाना बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई, वरिष्ठ पोलीस निरीक्षक व स्थानिक वरिष्ठ पोलीस निरीक्षक यांना अनधिकृतपणे जाहिरात लावणाऱ्या संस्थेवर कार्यवाही करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. तसेच भविष्यात अशा अनधिकृत जाहिराती दिशादर्शक फलकांवर लावण्यापासून प्रतिबंध करण्यासाठी स्थानिक पोलीस विभागाला कारवाई करणेबाबत मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत कळविण्यात येत आहे.

---

# मंत्रालयाच्या मुख्यद्वारा समोरील विधानभवन येथे जाणाऱ्या रहदारीच्या मार्गावर अनधिकृतरित्या वाहने पार्किंग केल्या जात असल्याबाबत

**(२) ४३९८० (२५-१०-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.आनंदराव पाटील, डॉ.वजाहत मिर्झा, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मंत्रालयाच्या मुख्यद्वारा समोरील विधानभवन येथे जाणाऱ्या रहदारीच्या मार्गावर तसेच मा.मंत्री महोदयांच्या बंगल्याच्या बाजूस असलेल्या मोकळया जागेवर दररोज जवळपास १०० ते १५० वाहने अनधिकृतरित्या पार्किंग केल्या जात असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर वाहनांचे वाहनचालक गटागटाने एकत्र बसून जुगार खेळणे, अस्वच्छता पसरविणे, महिलांनापाहून अश्लील बोलणे व शिवीगाळ करणे अशा प्रकारची अशोभणीय वर्तन करित असल्यासंदर्भात मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद यांनी तसेच नागरिकांनी वरिष्ठ पोलीस निरीक्षक, मरीन लाईन, पोलीस ठाणे यांना दिनांक ३० ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदरहू अनधिकृतपणे पार्किंग होत असलेल्या वाहनांची कोणत्याही प्रकारे तपासणी होत नसल्यामुळे वाहनांमधून स्फोटके वा विध्वंसक साहित्य आणण्यात येऊन स्फोट केल्यास जवळपासच्या शासकीय इमारतींना गंभीर स्वरुपाचा धोका निर्माण होऊन अपघात होण्याची शक्यता आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, प्रश्नोक्त भाग १ ते ३ बाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय निष्पन्न झाले व त्यानुषंगाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) सदर ठिकाणी वाहने पार्क करण्यात होत होती हे खरे आहे. परंतु सदर जागा हि नो पार्किग झोन घोषित केलेली नाही तसेच विशिष्ट वाहनांसाठी राखीव ठेवलेली नसल्याने सदर ठिकाणी पार्किग करण्यात आलेली वाहने अनधिकृतपणे पार्क केली आहेत असे म्हणता येणार नाही.

(२) हे खरे आहे.

मा.विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद यांनी ४ सप्टेंबर २०१८ रोजी वरिष्ठ पोलीस निरीक्षक, मरिन ड्राईव्ह, पोलीस ठाणे यांना लेखी निवेदन दिले आहे.

(३) सदर रस्ता आम रहदारीचा रस्ता असल्याने त्यावर विशेष सुरक्षा तपासणी यंत्रणा ठेवण्यात आलेली नाही. परंतु एकदया वाहनाबाबत संशयीत असल्याचा संदेश मिळाल्यास वाहतूक विभागाचे पोलीस अंमलदार नमुद ठिकाणी तात्काळ पोहचून वाहनाचे निरीक्षण करतात व त्यांना नमुद वाहनामध्ये काही स्फोटकासारखे पदार्थ असण्याचा संशय वाटल्यास ते तात्काळ मुख्य नियंत्रण कक्षास संदेश देवून स्थानिक पोलीस ठाण्याच्या पोलिसांस व बॉम्ब नाशक पथकास नमूद ठिकाणी पाचारण करुन संशयित पदार्थाचे निष्कासन केले जाते. त्यामुळे सदर ठिकाणी होणारे अपघात ठाळले जावू शकतात. तसेच मंत्रालयास विशेष सुरक्षा यंत्रणा पुरविण्यात आली असून मंत्रालयाच्या शासकीय इमारतीच्या आजु बाजूस तैनात असलेले पोलीस अंमलदार सुरक्षेची काळजी घेत असतात.

(४) उपरोक्त नमूद अर्जातील तक्रारीची दखल वरिष्ठ पोलीस निरीक्षक, मरिन ड्राईव्ह पोलीस ठाणे नी स्वत: घेतली असून विधान भवन पथ येथे समक्ष जाऊन पाहणी केली तसेच विधान भवनालगतच्या रस्त्यावर कोणतेही अवैध वाहने उभे राहु नये म्हणून १) वरिष्ठयां पोलीस निरीक्षक, कुलाबा वाहतूक विभाग, मुंबई यांना दिनांक २/१०/२०१८ अन्वये पत्र देऊन विधान भवन मार्ग येथे अनधिकृतपणे पार्किंग केलेल्या वाहनांवर कायदेशीर कारावाई करण्याबाबत कळविण्यात आले आहे. २) वरिष्ठ पोलीस निरीक्षक, बॉम्बशोधक पथक, काळाचौक, मुंबई यांना दिनांक २०/०९/२०१८ अन्वये पत्र देऊन विधानभवन परिसराची घातपात विरोधी तपासणी पथकाकडुन नियमितपणे तपासणी करण्याबाबत कळविण्यात आले आहे. व्यवस्थापक

यांच्याकडुन सदर ठिकाणची पार्किंग व्यवस्थित करुन घेण्यात येईल तसेच त्याठिकाणी अनधिकृतपणे वाहने लागू नये म्हणून त्याठिकाणी २ सुरक्षा रक्षकांची नेमणूक करण्यात येईल असे सांगितले आहे, ३) शिपिंग कॉर्पोरेशन ऑफ इंडिया यांना दिनांक २०/०९/२०१८ अन्वये पत्र देण्यात आले असून त्यांच्याकडुन सुरक्षा रक्षकांची नेमणूक करुन पार्किंग व्यवस्थित करुन याची दक्षता घेण्यात येईल असे शिपिंग कॉर्पोरेशन ऑफ इंडिया यांच्याकडुन कळविण्यात आले आहे, ४) विधान भवन मार्गावर कोणतेही अनधिकृत कृत्य होऊ नये याकरीता मरिन ड्राईव्ह पोलीस ठाण्याचे बीट मार्शल्स, गस्तीवरील मोबाईल वाहने व मंत्रालय येथे बंदोबस्तास असलेले अधिकारी अंमलदार यांना सदर ठिकाणी वारंवार भेट देऊन मा.विरोधीपक्ष नेते, विधानपरिषद यांच्या तक्रारीच्या अनुषंगाने योग्य ती खबरदारी घेण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत व त्याप्रमाणे गस्त चालू करण्यात आली आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शासनाच्या आयटी विभागाने निर्माण केलेल्या महापरीक्षा पोर्टलद्वारे घेण्यात आलेल्या परिक्षेमध्ये मासकॉपी झाल्याबाबत

**(३) ४३९८९ (३०-१०-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.अनिकेत तटकरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.जगन्नाथ शिंदे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे, श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विविध शासकीय विभागांमध्ये पदभरती करण्यासाठी शासनाच्या आयटी विभागाने निर्माण केलेल्या महापरीक्षा पोर्टलद्वारे घेण्यात आलेल्या नगरपरिषद प्रशासन व लेखा निर्धारण सेवा यांच्या ऑनलाईन परिक्षेमध्ये मासकॉपी झाल्यामुळे निर्धारित दिवशी होणारा पेपर रद्द करुन पुन्हा इतर दिवशी पेपर घेण्यात आल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनाच्या आयटी विभागाने महापरीक्षा पोर्टलची निर्मिती केली असून या पोर्टलद्वारे परीक्षा घेण्याचे काम युएसटी ग्लोबल कंपनी ह्या गैरव्यवहार प्रकरणी कारवाई करण्यात आलेल्या खाजगी कंपनीला देण्यात आले असून संबंधित कंपनीने शासनाकडून देण्यात आलेली कोणतीही नियमावली न पाळता कामकाज केले असल्याची तक्रार लोकप्रतिनिधींनी माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार परिक्षेमध्ये मासकॉपी करु देणाऱ्या संबंधित दोषी कंपनी, परीक्षा निरीक्षक, परीक्षा केंद्र चालक व आयटी अधिकारी यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे तसेच सदर सर्व परीक्षा पूर्वीप्रमाणेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फतच राबविण्याबाबत कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) हे खरे नाही. महापरीक्षा पोर्टलद्वारे घेण्यात आलेल्या नगरपरिषद प्रशासन व लेखा निर्धारण सेवा ऑनलाईन परिक्षेमध्ये तांत्रिक बिघाड झाल्यामुळे पेपर अन्य दिवशी घेण्यात आली.

(२) हे अंशत: खरे आहे.

(३) महापरीक्षा पोर्टलव्दारे घेण्यात येणाऱ्या परिक्षांबाबत परिक्षार्थींच्या तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत. तसेच यासंदर्भात लोकप्रतिनिधींकडून पत्र प्राप्त झाले असून सदर पत्रामध्ये उपस्थित केलेल्या मुद्यांच्या अनुषगांने महापरिक्षेच्या कार्यपध्दतीचे विश्लेक्षण करून प्राप्त सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाहीचा तपशिलवार अहवाल तयार करण्यात येत आहे. तसेच महापरीक्षा पोर्टलचे तांत्रिक परीक्षण त्रयस्थ संस्थेमार्फत करण्यात येत आहे. अहवाल प्राप्त झाल्यानंतर त्यामधील निष्कर्षानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अंधेरी (पश्चिम) "म्हाडा" कॉलनीजवळील सिध्दार्थनगर येथील फिरते शौचालय गायब झाल्याबाबत

**(४) ४३९९१ (०१-११-२०१८). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अंधेरी (पश्चिम) येथील चार बंगला "म्हाडा" कॉलनीजवळील तब्बल ७०० ते ७५० कुटुंबांचे वास्तव्य असलेल्या सिध्दार्थनगरमध्ये स्वच्छ भारत अभियानांतर्गत महापालिकेने उपलब्ध करुन दिलेले फिरते शौचालय अवघ्या आठ दिवसातच वस्तीबाहेरुन गायब झाल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त फिरते शौचालय केवळ स्वच्छ भारत मोहिमेच्या सर्वेक्षणासाठी आलेल्या केंद्रीय पथकाला दाखविण्यासाठी उभारण्यात आले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, महापालिकेने सन २०१६ मध्ये स्वच्छ भारत अभियानांतर्गत उक्त ठिकाणी सार्वजनिक शौचालय बांधण्याचा निर्णय घेतला असून उपनगर जिल्हाधिकारी कार्यालयाकडून अद्याप ना-हरकत प्रमाणपत्र मिळू न शकल्याने सार्वजनिक शौचालयाचे बांधकाम प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त अभियानांतर्गत काही ठिकाणी शौचालये बांधण्यात आली असून देखभाल व दुरुस्ती अभावी सदर शौचालयाची दुरवस्था झालेली आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार शासनस्तरावर कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

अंधेरी (पश्चिम) येथे चार बंगला म्हाडा कॉलनीजवळील सिध्दार्थनगर येथील नागरीक शौचासाठी उघड्यावर जात असल्याबाबतची तक्रार बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राप्त झाली होती.

सदर तक्रारीनंतर तेथील नागरीकांना महानगरपालिकेमार्फत फिरते शौचालय उपलब्ध करून देण्यात आले होते. परंतु, स्थानिक नागरीकांच्या विरोधामुळे सदर शौचालय तेथून हलवून त्याऐवजी तेथे पोर्टेबल शौचालय उपलब्ध करून देण्यात आले आहे.

(३) सदर जागा ही म्हाडा प्राधिकरणाच्या मालकीची असून ते कांदळवन संरक्षित क्षेत्र आहे. त्याठिकाणी तात्पुरत्या स्वरूपात झोपड्या अस्तित्वात असून सदर ठिकाणी उपजिल्हाधिकारी (अतिक्रमन निर्मुलन) यांच्यामार्फत वेळोवेळी निष्काषनाची कार्यवाही करण्यात येते. त्यामुळे तेथे शौचालयाचे पक्क्या स्वरूपाचे बांधकाम करणे संयुक्त नसल्याने त्याऐवजी तेथे फिरते अथवा पोर्टेबल शौचालय उपलब्ध करून देण्यात आले आहे.

(४) हे ही खरे नाही.

मुंबई महानगरपालिका क्षेत्रात सध्या ७५,४६२ शौचकुपे उपलब्ध असून ती वापरात आहेत. तर २२,७७४ शौचकुपांचे बांधकाम प्रगतीपथावर आहे.

तसेच, स्वच्छ भारत अभियानांतर्गत महानगरपालिकेमार्फत के/पश्चिम (अंधेरी पश्चिम) विभागात सन २०१५-२०१६ पासून आरसीसी स्वरूपाची १४२ शौचकुपे बांधण्यात आली असून १३९ शौचकुपांचे काम प्रगतीपथावर आहे. सदर शौचालयांची देखभाल स्थानिक संस्थांमार्फत (सीबीओ) करण्यात येत आहे.

(५) व (६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मॅट्रिकोत्तर अभ्यासक्रमाच्या प्रवेशित विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीची रक्कम मिळण्याबाबत

**(५) ४३९९८ (२९-१०-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.अनिकेत तटकरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.जगन्नाथ शिंदे** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २०१८-२०१९ या शैक्षणिक वर्षातील मॅट्रिकोत्तर अभ्यासक्रमाचे प्रवेशित विद्यार्थ्यांना महाडीबीटीने नेमलेल्या सॉफ्टवेअर कंपनीच्या अकार्यक्षमतेमुळे शिष्यवृत्तीची रक्कम माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यानपर्यंत मिळालेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सन २०१७-२०१८ व २०१८-२०१९ या वर्षांच्या शिष्यवृत्तीच्या अनुदानाची रक्कम वितरीत करण्यास झालेल्या विलंबाची कारणे काय आहेत व त्यास कोण जबाबदार आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व सन २०१८-२०१९ व सन २०१७-२०१८ या वर्षांचे थकित अनुदान विद्यार्थ्यांना देण्याबाबत तसेच संबंधित अकार्यक्षम सॉफ्टवेअर कंपनीविरुध्द कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-११-२०१८) :** (१) हे खरे नाही. महाडीबीटी ही राज्यव्यापी संगणकीय प्रणाली सप्टेंबर, २०१८ अखेर कार्यान्वित (GO live) झाली आहे.
(२) सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षात तांत्रिक अडचणीमुळे प्रणाली कार्यान्वित होऊ शकली नाही. विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीची रक्कम ऑफलाईन पध्दतीने संबंधित विभागांकडून अदा करण्यात आली आहे. तसेच, शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करीता महाडीबीटी प्रणाली कार्यान्वित झालेली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षाकरीता महाडीबीटी प्रणाली कार्यान्वित आहे. २०१७-१८ या शैक्षणिक वर्षात विद्यार्थ्यांना ऑफलाईन पध्दतीने शिष्यवृत्त्यांचे वाटप संबंधित विभागांकडून करण्यात आले आहे. ज्या कंपनीने मागील वर्षी सदर प्रणाली विकसित केली होती त्या कंपनीकडून उच्चाधिकार समितीच्या (HPC) मान्यतेने त्याचे कामकाज काढून घेण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## चेंबूर, मुंबई येथील माहुल गाव परिसरातील भारत पेट्रोलियमच्या शुध्दीकरण प्रकल्पात स्फोट झाल्याबाबत

**(६) ४४००३ (३०-१०-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.अनिकेत तटकरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चेंबूर, मुंबई येथील माहुल गाव परिसरातील भारत पेट्रोलियमच्या शुध्दीकरण प्रकल्पात दिनांक ८ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास प्रचंड स्फोट झाल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर स्फोटाची उच्चस्तरीय चौकशी करण्याबाबतची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर स्फोटात किती जीवित व वित्तहानी झाली असून अपघातग्रस्तांना केंद्र वा राज्य शासनाने कोणत्या स्वरुपाची मदत केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२०-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

मुंबईतील चेंबूर येथे बीपीसीएलच्या हायड्रोकार्बन प्लांटमध्ये दिनांक ०८/०८/२०१८ रोजी इफ्ल्युंट कुलरमधील दाबयुक्त अतिज्वालाग्रही वायुची गळती झाल्याने सदर वायु वातावरणात मिसळला व त्याचा स्फोट होऊन आग लागण्याची घटना घडली.

(२) हे खरे नाही.

सदर घटनेची चौकशी औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयामार्फत करण्यात आली असून सदर घटनेमध्ये कारखान्यातील काम करणाऱ्या कामगारांच्या आरोग्याला धोका पोहचवू नये याकरीता कारखान्यातील सयंत्रे सुस्थितीत न ठेवल्यामुळे कारखाने अधिनियम,१९४८ चे कलम ७A(२)(a) चा भंग आढळून आल्याने सदर भंगाबाबत कारखान्याचे भोगवटादार यांचेविरुध्द मा.मुख्य न्यायदंडाधिकारी, दादर, मुंबई यांचे न्यायालयात खटला क्र.२९०२९१४/ २०१८ दिनांक ३१/१०/२०१८ रोजी दाखल करण्यात आला आहे.

(३) सदर स्फोटामध्ये एकूण ४१ कामगार जखमी झाले होते. यातील जखमी कामगारांवर कारखान्याच्या प्रथमोपचार केंद्रात उपचार करण्यात आले व त्यापैकी १९ कामगारांना त्याच दिवशी घरी सोडण्यात आले. उर्वरित २२ कामगारांना खाजगी दवाखान्यात दाखल करुन उपचारानंतर घरी सोडण्यात आले. यापैकी ३७ कामगार कामावर रुजू झाले आहेत व चार कामगारांवर घरी उपचार सुरु आहेत. सदर कामगारांच्या उपचाराचा खर्च कारखाने

व्यवस्थापनाने केलेला आहे. सदर घटनेत कोणासही अपंगत्व आलेले नाही वा कोणीही मृत पावलेले नाही.

सदर स्फोटात किती वित्तहानी झाली याबाबत व्यवस्थापनेकडून पडताळणी सुरु आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील माध्यमिक शाळांना १००% वेतन अनुदान मिळणेबाबत

**(७) ४४०२१ (०१-११-२०१८). श्री.कपिल पाटील : दिनांक २० जुलै, २०१८ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक १ मधील प्रश्न क्रमांक ४०६०४ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ९१५ माध्यमिक शाळांना माहे मार्च, २००८ पासून वेतन अनुदान जाहीर केले, मात्र या शाळांना १००% वेतन अनुदान मिळालेले नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) नाही. सदर शाळांना १०० टक्के वेतन अनुदान देण्यात येत असून शासन निर्णय, दिनांक २१ ऑगस्ट, २०१८ नुसार उपरोक्त १०० टक्के अनुदानित शाळांचा खर्च अनिवार्य लेखाशिर्षात बदल करण्यात आला आहे.

(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आधार कार्ड नसणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या समाविष्ट करुन शाळांची संचमान्यता नव्याने करण्याबाबत

**(८) ४४०२४ (०१-११-२०१८). श्री.कपिल पाटील, श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शाळांतील संचमान्यता, शालेय योजना आणि इतर शालेय कामकाजासाठी आधार सक्ती करण्यात येत असून मा.सर्वोच्च न्यायालयाने आधार सक्ती संदर्भात दिलेल्या निर्णयानंतर शासनाने काय कार्यवाही केली आहे,

(२) असल्यास, शालेय शिक्षण विभागाने पहिली ते बारावीच्या विद्यार्थ्यांना आधार कार्ड नोंदणीची सक्ती केली असतानाही राज्यातील बहुतांश विद्यार्थ्यांची अदयाप आधार कार्डच काढलेली नसल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील १ कोटी ८ लाख ७३ हजार विद्यार्थ्यांचे आधार क्रमांक अदयाप अपडेट झाले नसून सर्वाधिक विद्यार्थी मुंबई-ठाण्यातील असल्याचे निदर्शनास आले आहे, तसेच उक्त विद्यार्थी आधार नोंदणीपासून वंचित राहण्याची कारणे काय आहेत,

(४) असल्यास, आधार कार्ड नसणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या समाविष्ट करुन सन २०१७-२०१८ आणि २०१८-२०१९ ची संचमान्यता नव्याने करण्याबाबत तसेच यापूर्वी केलेली संचमान्यता मागे घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) संचमान्यतेसाठी आधार सक्ती करण्यात आली नव्हती. इतर योजनांसाठी १०० टक्के विद्यार्थ्यांचे आधारकार्ड काढण्याबाबत सूचना दिलेल्या होत्या. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयानंतर वैयक्तिक लाभाच्या योजनांसाठी आधारकार्ड आवश्यक आहे.

(२) अंशतः खरे आहे.

(३) मुंबई शहर-२,१९,४३७, मुंबई उपनगर-३,८३,८२७, ठाणे-७,२७,८५९ विद्यार्थ्यांचे आधारकार्ड पोर्टलवर नोंदविलेले नाही.

विद्यार्थी आधार नोंदणीपासून वंचित राहण्याची कारणे.

१) पालकांनी विद्यार्थ्यांचे काढलेले आधारकार्ड शाळेस उपलब्ध करुन न देणे.

२) लहान वयोगटातील असल्याने आधार कार्ड काढलेले नसणे.

३) विद्यार्थ्यांच्या ठिकाणाच्या परिसरात आधार केंद्राची उपलब्धता नसणे.

(४) शाळेतील आधार कार्ड असलेले व नसलेले अशा सर्वच विद्यार्थ्यांची संख्या संच मान्यतेसाठी घेण्यात आलेली आहे. त्यामुळे सन २०१७-१८ व २०१८-१९ ची संच मान्यता नव्याने करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राधेकृष्ण पार्क हौसिंग सोसायटी, पिसवली (ता.कल्याण, जि.ठाणे) येथील नागरिकांकडून अवैध कर वसूल केल्याबाबत

**(९) ४४०२६ (०१-११-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर : तारांकित प्रश्न क्रमांक ४३७१० ला दिनांक ११ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राधेकृष्ण पार्क हौसिंग सोसायटी, पिसवली (ता.कल्याण, जि.ठाणे) या सोसायटीकरीता महाराष्ट्र आद्योगिक विकास महामंडळाकडून पाणी घेऊन महापालिकेमार्फत पुरवठा केला जातो, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त सोसायटीने महानगरपालिकेस नळजोडणीसाठी केव्हा प्रस्ताव सादर केला व उक्त प्रस्तावास कोणत्या कालावधीत मान्यता देण्यात आली असून किती इंचाची नळजोडणी देण्यात आली आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेत दिनांक १ जून, २०१५ पासून २७ गावांचा समावेश करण्यात आलेला आहे.

२७ गावांकरीता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत पाणीपुरवठा उपलब्ध करून घेऊन महानगरपालिकेमार्फत वितरीत करण्यात येतो.

राधेकृष्ण पार्क हौसिंग सोसायटी ही २७ गावामधील पिसवली विभागातील सोसायटी असून सदर सोसायटीस महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून स्वतंत्र नळजोडणीद्वारे पाणीपुरवठा केला जातो.

या पाणी पुरवठ्याचे बील सदर सोसायटीकडून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे भरण्यात येते, ही वस्तुस्थिती आहे.

(२) राधेकृष्ण पार्क हौसिंग सोसायटीस महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत स्वतंत्र नळजोडणीद्वारे पाणीपुरवठा केला जात असल्याने सदर सोसायटीने नवीन नळजोडणीकरीता महानगरपालिकेकडे प्रस्ताव सादर केला नसल्याचे महानगरपालिकेने कळविले आहे.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## दोडामार्ग (जि.सिंधुदुर्ग) येथील तिलारी धरणावर बांधलेल्या चौक्या विनावापर पडून असल्याबाबत

**(१०) ४४०५३ (०३-११-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दोडामार्ग (जि.सिंधुदुर्ग) येथील तिलारी धरणावर बांधलेल्या सुरक्षा चौक्या अजूनही विनावापर पडून असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कालवा विभागाने धरणावर देखरेख ठेवण्यासाठी गरज नसतानाही सुरक्षारक्षक यांना रहाण्यासाठी लाखो रुपये खर्च करुन चौक्या उभारल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने संबंधित दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१९-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.

तिलारी प्रकल्पाच्या सुरक्षा व्यवस्थेसाठी सद्य:स्थितीत चौकीदार यांची नियुक्ती करणेत आलेली आहे. सदर चौक्यांचा वापर हा प्रकल्पावर देखरेख करण्यासाठी केला जातो.

(२) नाही.

तिलारी धरण स्थळ हे शासनाने निर्देशित केलेल्या मर्मस्थळांमध्ये समाविष्ट असल्याने त्याची देखरेख होणे आवश्यक आहे. तसेच पावसाळयातील दक्षतेच्या दृष्टीने धरणांवर चौकीदार असणे अत्यावश्यक आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात विविध शासकीय योजनेमध्ये कंत्राटी पध्दतीने काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना सेवेत कायम करण्याबाबत

**(११) ४४०५४ (३०-१०-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.आनंद ठाकूर : तारांकित प्रश्न क्रमांक ४२२७८ ला दिनांक ४ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शासनामार्फत विविध शासकीय योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता सर्वत्र कंत्राटी कर्मचाऱ्यांची नियुक्ती केली जाते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासन विविध शासकीय योजनांवर कोटयवधीचा निधी खर्च करीत असताना कंत्राटी कर्मचाऱ्यांना अपुऱ्या सुविधा व कमी वेतनात राबविण्यात येत असल्यामुळे उक्त कर्मचारी चांगली संधी आल्यास नोकरी सोडून जात असल्याने शासकीय योजनेच्या अंमलबजावणीवर त्याचा परिणाम होऊन निधीचा अपव्यय होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

राज्य शासनाच्या काही मंत्रालयीन प्रशासकीय विभागांमार्फत राबविण्यात येत असलेल्या योजनांच्या अंमलबजावणीकरीता काही प्रमाणात कंत्राटी तत्वावरील कर्मचाऱ्यांची नियुक्ती केली जाते.

(२), (३) व (४) राज्य शासनाच्या विविध प्रशासकीय विभागांतर्गत किती कंत्राटी कर्मचारी कार्यरत आहेत, याचा विचार करुन राज्यातील कंत्राटी पदधारकांना नियमित सेवेत सामावून घेण्याबाबतच्या प्रकरणाबद्दल परिपूर्ण अभ्यास करुन अहवाल सादर करण्यासाठी मा.मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली आहे.

राज्यातील कंत्राटी पदधारकांना नियमित सेवेत सामावून घेण्याबाबतच्या प्रस्तावाबाबतची संपूर्ण कागदपत्रे/ माहिती, सदर कंत्राटी पदधारक ज्या प्रशासकीय विभागांतर्गत कार्यरत आहेत, त्या विभागांच्या विभागप्रमुखांकडून या समितीस उपलब्ध करुन द्यावयाची आहे.

राज्य शासनाच्या विविध कल्याणकारी योजनांच्या अंमलबजावणीसाठी कार्यरत असलेल्या कंत्राटी तत्वावरील कर्मचाऱ्यांचा तपशील, तसेच हे कर्मचारी सेवा सोडून जात असल्यास, त्याचा योजनांच्या अंमलबजावणीवर विपरीत परिणाम होऊन निधीचा अपव्यय होत आहे किंवा कसे, याबाबत तपासणी करुन ही बाब मा.मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या विचारार्थ ठेवण्याबाबत राज्य शासनाच्या कौशल्य विकास व उद्योजकता विभागास सूचना देण्यात आल्या आहेत.

---

## राज्यातील लहान-मोठ्या शहरातील कत्तलखान्यात निर्माण होणाऱ्या सांडपाण्यावर प्रक्रिया करण्यासाठी स्वतंत्र यंत्रणा उभारण्याबाबत

**(१२) ४४०७३ (०१-११-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील लहान-मोठ्या शहरात दहा किंवा त्यापेक्षा कमी जनावरांची कत्तल करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत उभारण्यात आलेल्या कत्तलखान्यात निर्माण होणाऱ्या सांडपाण्यावर प्रक्रिया करण्यासाठी स्वतंत्र यंत्रणा उभारण्यात यावी, असे निर्देश नगरविकास विभागाने महानगरपालिका, नगरपालिका आणि नगरपंचायतींना माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निर्देशानुसार राज्यातील संबंधित महानगरपालिका, नगरपालिका आणि नगरपंचायतींनी पाहणी करुन कोणती उपाययोजना केली, तसेच निर्देशाचे पालन न करणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे व त्याबाबतची सद्यःस्थिती काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) जिल्हा पातळीवर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली कत्तलखान्यांची तपासणीकरीता गठीत करण्यात आलेल्या समितीला उक्त मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यातील संबंधित महानगरपालिका, नगरपालिका आणि नगरपंचायतींची पाहणी करुन अहवाल सादर करण्याबाबत निदेश देण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बोरीवली (मुंबई) येथील मुंबई महानगरपालिकेच्या मनोरंजनासाठी आरक्षित असलेल्या भूखंडावर ब्रम्हक्षत्रीय समाज ट्रस्टने अनधिकृत बांधकाम केल्याबाबत

**(१३) ४४१०३ (०१-११-२०१८). श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बोरीवली (मुंबई) येथील शांती आश्रम, कल्पना चावला मार्ग, बेस्ट आगाराच्या पाठीमागील महानगरपालिकेच्या मनोरंजनासाठी आरक्षित असलेल्या शहर भूमापन क्र. १५०५ या भूखंडावर ब्रम्हक्षत्रीय समाज ट्रस्टने मुंबई महानगरपालिकेच्या संबंधित अधिकाऱ्यांशी संगनमत करून पाच गाळ्यांचे पक्के सिमेंटचे अनधिकृत बांधकाम केले असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ च्या अंतिम सप्ताहात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अनधिकृत बांधकामाची शासनाने चौकशी केली आहे, चौकशीत काय आढळून आले आहे व त्यानुसार अनधिकृत बांधकाम निष्कासित करून शासकीय भूखंडाचे संरक्षण करण्याबाबत शासनाकडून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे तसेच उक्त अनधिकृत बांधकामास संरक्षण देणाऱ्या संबंधित अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई प्रस्तावित करण्यात आली वा येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) उद्यानासाठी राखीव असलेल्या भूखंडावरील बांधकामाबाबत अशा आशयाची दिनांक २४/०४/२०१८ रोजीची तक्रार बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राप्त झाली होती ही वस्तुस्थिती आहे.

सदर तक्रारीच्या अनुषंगाने बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत सदर ठिकाणी दिनांक १७/०७/२०१८ रोजी स्थळपाहणी करण्यात आली असता, ब्रम्हक्षत्रीय समाज ट्रस्टने विटांचे पक्के बांधकाम करुन त्यावर सिमेंटचे पत्रे असलेले ४ खोल्या तसेच, विटांच्या खांबांवर सिमेंट पत्रे टाकलेले एक बांधकाम अशा प्रकारचे अनधिकृत बांधकाम आढळून आले.

(२) व (३) सदर अनधिकृत बांधकामधारकास महानगरपालिकेमार्फत दिनांक १७/०७/२०१८ रोजी मुंबई महानगरपालिका अधिनियम १८८८ च्या कलम ३५१ अन्वये तसेच, महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६ च्या कलम ५५ अन्वये नोटीसा बजावण्यात आल्या आहेत.

सदर नोटीशींच्या उत्तरादाखल बांधकामधारकाने बांधकामांच्या अस्तित्वाची कागदपत्रे बृहन्मुंबई महानगरपालिकेस सादर केली. सदर कागदपत्रांची पडताळणी केल्यानंतर, सदर अनधिकृत बांधकामे काढून टाकण्यासाठी संबंधित बांधकामधारकास दिनांक १९/१०/२०१८ रोजी आदेश बजावण्यात आले.

सदर आदेशाविरुध्द बांधकामधारकाने शहर दिवाणी न्यायालय, दिंडोशी येथे एल.सी. सुट क्रमांक ३२०४/२०१८ व ३२४१/२०१८ अन्वये दावा दाखल केला असून, मा.न्यायालयाने सदर प्रकरणी दिनांक ३०/१०/२०१८ रोजी स्थगिती आदेश दिले आहेत.

सदर प्रकरणी मा.न्यायालयाच्या आदेशानुसार बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत पुढील कार्यवाही करण्यात येणार आहे.

---

## मौजे नायगाव (ता.खंडाळा, जि.सातारा) येथे ग्रामसचिवालय व सावित्रीसृष्टी प्रकल्प उभारण्याबाबत

**(१४) ४४१०८ (०३-११-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, अॅड.रामहरी रुपनवर, अॅड.हुस्नबानू खलिफे, आर्कि.अनंत गाडगीळ, डॉ.सुधीर तांबे, श्री.मोहनराव कदम, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) मौजे नायगाव (ता.खंडाळा, जि.सातारा) हे ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले यांचे जन्मगाव असून नायगाव येथे ग्रामसचिवालय व सावित्रीसृष्टी प्रकल्प उभारण्याबाबतचे निवेदन दिनांक ७ फेब्रुवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास मा.ग्रामविकास मंत्री यांना सरपंच, नायगाव यांनी दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ग्रामसचिवालय व सावित्री सृष्टींतर्गत जैव विविधता पार्क (Bio Diversity Park), महात्म्यांचे चरित्र दर्शन, जीवन प्रसंग, स्मृती उद्यान, होलाग्राफीक ऑडोटोरियम बांधण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) मौजे नायगाव (ता.खंडाळा, जि.सातारा) येथे मा.बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजनेमधून ग्रामपंचायत इमारत बांधण्यासाठी निधीच्या उपलब्धतेनुसार शासन मान्यता देण्यात येईल.

सावित्री सृष्टींतर्गत जैव विविधता पार्क (Bio Diversity Park), महात्म्यांचे चरित्र दर्शन, जीवन प्रसंग, स्मृती उद्यान, होलाग्राफीक ऑडोटोरियम बांधण्याचा प्रस्ताव जिल्हा परिषद, सातारा यांचेकडून जिल्हाधिकारी, सातारा यांचेकडे दिनांक १५/११/२०१८ रोजी सादर करण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## महाराष्ट्रातील शेतकऱ्यांच्या पीक विम्याची रक्कम पश्चिम बंगालमधील राज्य सहकारी बँकेच्या खात्यात वळती करण्यात आल्याबाबत

**(१५) ४४११३ (२६-१०-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) प्रधानमंत्री पीक विमा योजनेंतर्गत गतवर्षी पीक विमा काढलेल्या अकोला जिल्हयातील अकोट तालुक्यासह अन्य ठिकाणच्या शेतकऱ्यांची पीक विम्याची रक्कम पश्चिम बंगालमधील स्टेट को-ऑपरेटिव्ह बँकेच्या लोहापूर शाखेच्या खात्यात वळती करण्यात आल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याप्रकरणी अकोला जिल्हा नियोजन समितीच्या दिनांक १६ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास झालेल्या बैठकीत संबंधित शेतकऱ्यांनी तक्रार केली असता अकोला जिल्हा नियोजन समिती अध्यक्ष तथा मा.पालकमंत्री श्री.रणजीत पाटील यांनी याप्रकरणी चौकशी करण्यात येणार असल्याचे आश्वासित केले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नूसार अकोला जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या पीक विम्याची रक्कम पश्चिम बंगाल मधील लोहापूर शाखेत जमा झाल्याबाबत व शेतकऱ्यांना न्याय मिळण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३) प्रधानमंत्री पीक विमा योजना खरीप हंगाम २०१७ मध्ये अकोला जिल्ह्यामध्ये नॅशनल इन्शुरन्स कंपनीमार्फत राबविण्यात आलेली आहे. खरीप हंगाम २०१७ मध्ये अकोला जिल्ह्यामध्ये १.५७ लाख शेतकऱ्यांनी रुपये ९६.८६ कोटी इतका विमा हप्ता भरुन १.३१ लाख हेक्टर विमा क्षेत्र संरक्षित केले. नॅशनल इन्शुरन्स कंपनीमार्फत प्राप्त झालेल्या अंतरीम अहवालानुसार १.२४ लाख पात्र शेतकऱ्यांना रुपये १२०.४१ कोटी इतकी नुकसान भरपाई मंजूर करण्यात आलेली असून, शेतकऱ्यांच्या बँक खात्यावर नुकसान भरपाई जमा करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे नायगाव (ता.खंडाळा, जि.सातारा) हे ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले यांचे जन्मगाव असून या गावाचा “ब” वर्ग पर्यटन स्थळामध्ये समावेश करण्याबाबत

**(१६) ४४११५ (०३-११-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, श्री.जनार्दन चांदूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.मोहनराव कदम, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे नायगाव (ता.खंडाळा, जि.सातारा) हे ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले यांचे जन्मगाव असून या गावाचा “ब” वर्ग पर्यटन स्थळामध्ये समावेश करण्यात आला नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, “क” वर्ग पर्यटन स्थळाचा समावेश “ब” वर्ग पर्यटन स्थळात करणेसाठी जिल्हाधिकारी, सातारा व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सातारा यांनी दिनांक २८ मार्च, २०१६ रोजी प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचेकडे सादर केलेला प्रस्ताव प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त “क” वर्ग पर्यटन स्थळाचा समावेश “ब” वर्ग पर्यटन स्थळात करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२०-११-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, दिनांक १६/०१/२०१२ मधील तरतूदीनुसार जिल्हाधिकारी, सातारा यांनी दिनांक २८/०३/२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावामध्ये ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले यांचे जन्मगांव नायगांव या “क” वर्ग पर्यटन स्थळाचा “ब” वर्ग पर्यटनस्थळात समावेश करण्याची विनंती केली होती. तथापि, शासन निर्णय, दिनांक १६/०१/२०१२ अन्वये “ब” वर्ग पर्यटनस्थळे घोषित करण्यासाठी निकष निश्चित करण्यात आलेले नव्हते.

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, दिनांक २५/०४/२०१७ अन्वये राज्यातील “ब” वर्ग पर्यटनस्थळे घोषित करण्यासाठी निकष निश्चित करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयातील निकषांनुसार ज्ञानज्योती सावित्रीबाई फुले यांचे जन्मगांव नायगांव या स्थळास “ब” वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याबाबतचा सुधारित प्रस्ताव जिल्हाधिकारी, सातारा यांच्याकडून मागविण्यात आलेला आहे. जिल्हाधिकारी, सातारा यांच्याकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर शासन निर्णय, दिनांक २५/०४/२०१७ मधील निकषांनुसार सदर स्थळास “ब” वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याबाबत तपासून उचित कार्यवाही करण्यात येईल.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील खाजगी शाळांना अनुदान देण्याबाबत

**(१७) ४४१२५ (०१-११-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील ६३ खाजगी शाळा मागील अनेक वर्षापासून अनुदानाच्या प्रतिक्षेत असून आर्थिक परिस्थितीचे कारण पुढे करुन शिक्षण विभाग अनुदान देण्यास विलंब करीत असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबईतील ६३ प्राथमिक शाळांनी मुंबई मनपाच्या मान्यतेसह अनुदानासाठी अर्ज केला परंतू मागील काही वर्षात यावर निर्णय घेण्यात आले नसल्याने शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना कमी वेतनात काम करावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शाळांना अनुदान देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) मुंबईतील मान्यताप्राप्त विनाअनुदानित ६३ शाळांना शासन किंवा बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून अनुदान मिळत नसल्याबाबतचे वृत्त दिनांक २२/१२/२०१७ रोजीच्या महाराष्ट्र टाईम्स या वृत्तपत्रात प्रसिध्द झाले होते ही वस्तुस्थिती आहे.

(२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील खाजगी प्राथमिक शाळांना लागू असलेल्या अनुदान सहाय्य संहितेनुसार, प्रथम मान्यता दिलेल्या पात्र शाळांना अनुदान सहाय्य मंजूर करण्यात येते.

बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील सन २००१ पर्यंतच्या खाजगी प्राथमिक शाळांना राज्य शासनाकडून ५०% व बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून ५०% अनुदान देण्यात येते.

तथापि, सन २००१-०२ या शैक्षणिक वर्षापासून बृहन्मुंबई महानगरपालिकेने त्यांच्या क्षेत्रात मान्यता दिलेल्या खाजगी प्राथमिक शाळांचे अनुदान यापुढील कालावधीत राज्य शासनाच्या अनुदानासाठी ग्राह्य धरले

जाणार नसल्याबाबत शालेय शिक्षण विभागाने दिनांक १३/०१/२००४ रोजी महानगरपालिकेस कळविले आहे.

सन २००१ ते २००४ पर्यंतच्या खाजगी प्राथमिक शाळांना शासनाच्या ५०% अनुदानासाठी ग्राह्य धरण्यासाठी दिनांक ०३/१२/२०१६ रोजीच्या पत्रान्वये शालेय शिक्षण विभागास विनंती करण्यात आली होती. तथापि, दिनांक १३/०१/२००४ रोजीच्या पत्रामधील निर्णयात कायम असल्याचे शालेय शिक्षण विभागाने महानगरपालिकेस कळविले आहे.

या अनुषंगाने दिनांक १३ जानेवारी, २००४ नंतर विनाअनुदानित तत्वावर प्रथम मान्यता दिलेल्या खाजगी प्राथमिक शाळांना अनुदान मंजूर करता येत नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत संबंधित शाळा व्यवस्थापनांस कळविण्यात आले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शाळा व वर्ग तुकड्या यांना अनुदानाच्या प्रचलित धोरणानुसार वाढीव टप्पा देणेबाबत

**(१८) ४४१४२ (०१-११-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ च्या शासन आदेशाने १६२८ शाळा व २४५२ वर्ग तुकड्या यांना दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ च्या शासन आदेशातील टप्पा रद्द करून सरसकट २० टक्के अनुदान देण्यात आले परंतु सदर शाळा व वर्ग तुकड्या यांना प्रचलित नियमानुसार अनुदान टप्पा मिळणेबाबत शासनाकडे वारंवार मागणी करण्यात येत आहे व प्रसंगी आंदोलने व उपोषणे करण्यात आलेली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यामध्ये अनुदानित शाळेवर विनाअनुदानित ५९७३ तुकड्यांवर ९ हजार शिक्षक विद्यादानाचे कार्य करीत असून विनाअनुदानित शाळांना दिलेल्या २० टक्के अनुदानाप्रमाणे राज्यातील ५९७३ तुकड्यांवरील ९ हजार शिक्षकांना टप्प्या-टप्प्याने अनुदान देण्याबाबत शासनाने कार्यवाही केली

आहे काय, सदर तुकड्यांवरील शिक्षकांना केव्हापर्यंत अनुदान देण्यात येणार आहे,

(३) तसेच सोलापूर जिल्ह्यातील खाजगी प्राथमिक शाळांचे माहे ऑगस्ट, २०१८ चे वेतन अंशतः अनुदानितच्या मान्यता न घेतल्याने थकविण्यात आले असून सदर वेतन थकविल्याने या शिक्षकांना अनेक आर्थिक व मानसिक त्रासाला सामोरे जावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ च्या शासन आदेशाने वेतन घेत असलेल्या शाळेतील कर्मचाऱ्यांना प्रचलित नियमानुसार वेतन मिळणेबाबत तसेच तुकड्यांवर सेवा देणाऱ्या शिक्षकांना अनुदान देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) शासन निर्णय, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये प्राथमिक व माध्यमिक शाळांना द्यावयाच्या अनुदान सूत्रामध्ये सुधारणा करुन शासनाच्या पुढील आदेशापर्यंत, सरसकट २० टक्के प्रमाणे अनुदान सूत्र विहित करण्यात आले आहे.

(२) वर्ग/तुकड्यांच्या मूल्यांकनाबाबत योग्य ती कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) व (४) सोलापूर जिल्ह्यातील खाजगी प्राथमिक २० टक्के अनुदान पात्र शिक्षकांचे वेतन अनुदानित मान्यता सादर न केल्याने ऑगस्ट, २०१८ पासून स्थगित करण्यात आले होते. तथापि, अनुदानित मान्यता सादर करण्याचे हमीपत्र घेऊन ऑगस्ट, २०१८ ते ऑक्टोबर, २०१८ पर्यंतची वेतन देयके कोषागारात सादर करण्यात आली आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विदर्भात स्क्रब टायफस या आजाराने रूग्णांचा मृत्यू झाल्याबाबत

**(१९) ४४१७३ (०३-११-२०१८). डॉ.वजाहत मिर्झा, श्री.शरद रणपिसे, ॲड.हुस्नबानू खलिफे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, डॉ.सुधीर तांबे, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.रामदास**

**आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात विशेषत: विदर्भात मोठ्या प्रमाणात स्क्रब टायफस व डेंग्यू या आजाराने मोठ्या प्रमाणात थैमान घातले असून स्क्रब टायफसचे ८० रुग्णांची तर डेंग्यूच्या ६९ रुग्णांची मेडीकल व मेयोमध्ये नोंद झाली असून एकूण १४ जणांचा मृत्यू झाल्याचे दिनांक ६ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, स्क्रब टायफस आजारावर परिणामकारक औषधोपचार करण्यास शासनास अपयश आले असून विदर्भातील नागपूरसह वर्धा, गडचिरोली, अमरावती जिल्ह्यातही रूग्ण आढळून आले असून यवतमाळ जिल्ह्यात डेंग्यू आणि स्क्रब टायफस या आजाराचे ५७ रुग्ण पॉझिटिव्ह असल्याचे व संपूर्ण जिल्ह्यात या आजाराच्या रुग्णांमध्ये वाढ होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, चौकशीच्या अनुषंगाने डेंग्यू, स्क्रब टायफस आजारांच्या रुग्णांची होत असलेली वाढ थांबविण्याबाबत व या आजाराला परिणामकारकरित्या आळा घालण्याचेदृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२२-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

दिनांक ०१/०१/२०१८ ते सप्टेंबर, २०१८ पर्यंत डेंग्यूने १८ व स्क्रब टायफसने २१ जणांचा मृत्यू झाला आहे.

(२) हे खरे नाही.

स्क्रब टायफस आजारावरील डॉक्सीसायक्लीन या गुणकारी औषधाचा पुरेसा साठा सार्वजनिक आरोग्य संस्थामध्ये उपलब्ध आहे व सर्व रुग्णांना औषधोपचार दिले जात आहे.

(३) चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही. तथापि, आढावा घेऊन परिणामकारक आळा घालण्याकरीता पुढील उपाययोजना करण्यात येत आहे.

- नियमित साथरोग सर्वेक्षण.
- किटकशास्त्रीय सर्वेक्षण आणि एकात्मिक किटक व्यवस्थापन.
- डेंग्यू व स्क्रब टायफस निदानाची आणि उपचाराची सुविधा पुरविणे.
- प्रभावी नियंत्रणासाठी राष्ट्रीय रोग नियंत्रण संस्था, नवी दिल्ली या संस्थेच्या तज्ञांचे मार्गदर्शन.
- सरकारी व खाजगी डॉक्टरांचे प्रशिक्षण.
- वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या क्षेत्रिय भेटी व मार्गदर्शन.
- विविध माध्यमातून जनतेला आरोग्य शिक्षण देणे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वसई-विरार येथै विकासकांनी नैसर्गिक नाले बुजवून बेकायदा केलेले बांधकाम तसेच अपूर्ण नालेसफाईमुळे पुरसदृष्य स्थिती निर्माण झाल्याबाबत

**(२०) ४४१७९ (०१-११-२०१८). डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वसई-विरार येथील काही भाग माहे जुलै, २०१८ मध्ये पावसामुळे संपूर्ण जलमय होवून ३० तास उक्त भागातील वीज बंद करण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, वसई-विरार येथे विकासकांनी भराव टाकून नैसर्गिक नाले बुजवून बेकायदा केलेले बांधकाम तसेच अपूर्ण नालेसफाई इत्यादी गोष्टी सदर पुरास कारणीभूत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी दोषी विकासकांवर तसेच नालेसफाई वेळेत न करणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) वसई विरार शहर महानगरपालिकेच्या क्षेत्रात उक्त पुरपरिस्थिती अतिवृष्टीमुळे झाली असल्याचे तसेच नैसर्गिक नाल्यांच्या पात्रामध्ये

अनधिकृत बांधकामे आढळुन आले नसल्याचे व नाले सफाईची कामे वेळीच केल्याचे वसई विरार शहर महानगरपालिकेने कळविले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कोथरुड (जि.पुणे) भेलकेनगर येथे विद्यार्थीनीच्या हॉस्टेलमध्ये तरुणीचे मोबाईलवरुन चित्रीकरण करण्यात आल्याबाबत

**(२१) ४४१८० (३०-१०-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोथरुड (जि.पुणे) भेलकेनगर येथे विद्यार्थीनीच्या हॉस्टेलमध्ये तरुणीचे मोबाईलवरुन चित्रीकरण करताना शरद दरेकर (रा.शिक्रापूर) या तरुणाला दिनांक ३१ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास पकडण्यात आल्याची घटना निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी लोकप्रतिनिधीनी मा.मुख्यमंत्री यांना दिनांक १ सप्टेंबर, २०१८ रोजी या संदर्भात लेखी निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार स्थानिक पोलीस स्थानकात कोणत्या कलमान्वये गुन्हा दाखल करण्यात आला असून आतापर्यंत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे व त्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) लोकप्रतिनिधी यांचे निवेदन प्राप्त झाल्याचे आढळून येत नाही.
(३) सदर घडलेल्या घटनेबाबत फिर्यादी पिडीत तरूणीने दिलेल्या तक्रारींवरून कोथरूड पोलीस स्टेशन येथे गु.र.नं. २४०/२०१८ भा.दं.वि. कलम ३५४ (क) प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात येवून सदर गुन्हयातील आरोपीस अटक करण्यात आली. दाखल गुन्हयातील आरोपीविरूध्द सबळ पुरावा प्राप्त करून सदर गुन्हयाचे दोषारोपपत्र मा.न्यायालयात पाठविण्याची तजविज ठेवली आहे. सद्य:स्थितीत सदर गुन्हा पोलीस तपासावर चालू आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय मध्ये सोयी-सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत

**(२२) ४४१८४ (०३-११-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर : तारांकित प्रश्न क्रमांक ४१२४९ ला दिनांक ५ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय येथे कॅन्सर सारख्या दुर्धर आजारावर उपचार करण्याकरीता अद्यावत सोयी-सुविधा उपलब्ध नसल्याने मागील तीन वर्षात किमान ३५० बाल रूग्ण मृत्यूमुखी पडले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सन २०१२ मध्ये त्याठिकाणी शासनाने कॅन्सर इन्स्टिट्युट सुरू करण्याची घोषणा केली असून त्यावर कोणतीच कार्यवाही झालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त ठिकाणी रक्ताच्या कॅन्सरकरीता १५० रूग्णांपैकी केवळ ३ टक्के रूग्णांवरच उपचार केले जात असून बाकी रूग्ण उपचाराविना परत जात आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन चौकशीच्या अनुषंगाने कॅन्सर सारख्या दुर्धर आजारावर उपचार करण्यासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२०-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

सदर संस्थेमध्ये मागील तीन वर्षात एकूण ३०३ बाल कर्क रुग्णांवर उपचार करण्यात आले आहेत. यापैकी १५३ रुग्णांवर उपचार सुरु आहेत व २१ रुग्णांनी अर्धवट उपचार घेतले आहेत. उर्वरित १२९ रुग्णांचा मृत्यू झाला आहे.

(२) हे खरे नाही.

(३) उक्त संस्थेमध्ये मागील तीन वर्षाच्या कालावधीत ११३ रक्ताच्या कर्करोग रुग्णांवर उपचार करण्यात आलेले आहेत.

(४) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथे कर्करोग उपचाराच्या अत्याधुनिक सोयी सुविधा निर्माण करण्याविषयीचा सर्वकष प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन आहे. याबाबत सदर संस्थेत कर्करोग उपचाराच्या अनुषंगाने रुपये २५ कोटी रुपयांची यंत्रसामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबईतील गावठाणे वगळता सर्व जागांची मालकी सिडकोकडे असल्याबाबत

**(२३) ४४१८७ (०१-११-२०१८). डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नवी मुंबईतील गावठाणे वगळता सर्व भागांना लिजचा दर्जा देवून मालकी हक्क सिडकोकडे दिल्यामुळे प्रत्येक काम करतांना सिडकोचे ना-हरकत प्रमाणपत्र घ्यावे लागत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नवी मुंबईतील शहराची निर्मिती जरी सिडकोने केली असली तरी शहर नियोजनाचे काम नवी मुंबई महानगरपालिकेमार्फत होत असून सध्या दोन प्राधिकरण अस्तित्वात असल्याकारणास्तव रहिवाशांना कुठल्याही कामाच्या परवानगीकरीता दोन्ही प्राधिकरणाची परवानगी घ्यावी लागत असल्यामुळे नागरिकांना फार मोठ्या गैरसाईचा सामना करावा लागत असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१), (२) व (३) होय, हे खरे आहे.

महाराष्ट्र प्रादेशिक आणि नगर नियोजन अधिनियमाच्या कलम ११८ अन्वये नवी मुंबई प्रकल्पासाठीच्या अधिसूचित क्षेत्रातील विकसित जमिनींचा भाडेपट्ट्यावर विनियोग करण्याचे अधिकार सिडको महामंडळाला आहेत. तसेच,

नवी मुंबई महानगरपालिकेच्या विकास नियंत्रण नियमावलीमधील नियम क्र/०६/३.१७ अन्वये जमिनीच्या विकासास परवानगी देण्यापूर्वी सिडकोचे ना-हरकत प्रमाणपत्र घेणे बंधनकारक आहे.

तथापि, नवी मुंबई प्रकल्पासाठी संपादित करण्यात आलेल्या व भाडेपट्टयाने वाटप करण्यात आलेल्या जमिनी मालकी तत्वावर भाडेपट्टाधारकास वाटप करता येणे शक्य नाही. सबब, भाडेपट्टयाने वाटप केलेल्या अशा जमिनींचा भाडेपट्टा कालावधी वाढवून फ्रि होल्ड बेसीस स्वरुपामध्ये करण्याच्या अनुषंगाने सिडको महामंडळाने प्रस्ताव शासनास सादर केला असून सदर प्रस्ताव विचाराधीन आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वारण मोरणा शिक्षण संस्थेची (जि.सांगली) परवानगी रद्द करून अनुदान बंद करण्याबाबत

**(२४) ४४२१० (०२-११-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वारण मोरणा शिक्षण संस्थेतील (जि.सांगली) आश्रमशाळेत ८ अल्पवयीन मुलींवर संचालकांनी बलात्कार व लौंगिक शोषण केल्याची घटना घडली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकरणात संस्थेचे संचालक श्री.अरविंद पवार व महिला कर्मचारी मनिषा कांबळे यांना अटक करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या अल्पवयीन मुलीबाबत शासन संरक्षण देणार काय तसेच अल्पवयीन मुली या गुन्हयाच्या साक्षीदार असल्याने संचालकांकडून त्यांना धमकी मिळणे अथवा त्रास देण्यासारखे प्रकार होणार असल्याने त्यांचे उर्वरीत शिक्षण यांची जबाबदारी शासन घेणार आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तसेच या संस्थेच्या माध्यमातुन असे अनेक मुलीचे आयुष्य उध्वस्त होत असल्याने या संस्थेची मान्यता तात्काळ रद्द करून अनुदान ही बंद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१९-११-२०१८) :** (१) व (२) होय.
(३), (४) व (५) होय, शासनस्तरावरुन सदर आश्रमशाळेवर प्रशासक नेमण्यात आलेला आहे. सदरहू संस्थेंतर्गत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांची मान्यता रद्द करुन त्यातील विद्यार्थ्यांना जवळच्या शाळेत सामावून घेण्याबाबतची कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## हर्णे (ता.दापोली, जि.रत्नागिरी) बंदरातील मच्छिमारांना डिझेल भावामध्ये सुट देण्याबाबत

**(२५) ४४२२३ (३१-१०-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.सुभाष झांबड, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मत्स्यविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हर्णे (ता.दापोली, जि.रत्नागिरी) बंदरातील मच्छिमारांनी डिझेल दरवाढीविरोधात आंदोलनात सहभागी होऊन आपला बंदमधील सहभाग नोंदविला असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये उक्त परिसरात खराब वातावरणामुळे मच्छिमारांची कधी जयगड खाडीतून आंजर्ले खाडीत, तर कधी आंजर्ले खाडीतून दिघी खाडीत तर पुन्हा दिघी खाडीतून दाभोळ खाडीत अशी मासेमारीविना धावपळ होत असून प्रत्येक मच्छिमारांना किमान चार ते पाच दिवसाच्या मासेमारीकरीता रुपये १ ते १.५ लाखांचे भरलेले डिझेल वाया जात आहे, त्यामुळे मच्छिमारांनी डिझेलच्या भावामध्ये सुट मिळण्याबाबत शासनाकडे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मच्छिमारांना डिझेलच्या भावामध्ये सुट देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (१३-११-२०१८) :** (१) नाही.
(२) डिझेलच्या भावामध्ये सुट मिळण्याबाबत मच्छीमार सहकारी संस्था किंवा मच्छीमार यांचेकडून निवेदन प्राप्त नाही
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## लवासा प्रकल्प विविध कारणांनी प्रलंबित असल्याबाबत

**(२६) ४४२२९ (०१-११-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बहुचर्चित लवासा प्रकल्प विविध कारणांनी प्रलंबित असल्याने दिवाळखोरीत व नादारी संहितेच्या (आयबीसी) नविन नियमानुसार प्लॅटधारकांना त्यांचे पैसे परत करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रक्रिया किती कालावधीत पूर्ण होणार आहे तसेच आयबीसीच्या नविन नियमांतर्गत लवासा रिअल कंपनी असल्याने या देणीमध्ये ग्राहकांचा हिस्सा असणार आहे काय,
(३) तसेच सदर प्रकल्पातील किती प्लॅटधारकांना व ग्राहकांना आतापर्यंत पैसे देण्यात आले असून कंपनीने पुनर्बांधणीचा आराखडा तयार करुन त्यास वित्त सहाय्य देण्यात आले आहे काय व त्याबाबतची सद्यःस्थिती काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-११-२०१८) :** (१) लवासा कंपनीने सार्वजनिकपणे वर्तमानपत्रात जाहिरात देऊन ज्या कोणाचे पैसे कंपनी देणे लागत आहे अशांना त्यांचे दावे दाखल करण्याचे आवाहन केले होते. या दाव्यांवर नादारी

व दिवाळखोरी कायदा अर्थात आयबीसी, २०१६ नुसार योग्य ती कार्यवाही केली जाईल व त्यांना धनको (क्रेडीटर्स) समजण्यात येईल. सोडवणूक योजनेनुसार धनकोंना पैसे देण्याची तरतूद असेल. यात फ्लॅटधारकांचाही समावेश असेल.

सर्व परतावे नादारी व दिवाळखोरी संहितेंतर्गत असलेले नियम व विनियम यांना अधिन राहून करण्यात येतील असे कंपनीने कळविलेले आहे.

(२) नादारी व दिवाळखोरी (आयबीसी) कायद्यान्वये या संपूर्ण कार्यवाहीला सुरुवात केलेल्या दिवसापासून १८० दिवसांची मुदत आहे. लवासा प्रकरणातील कार्यवाहीला दिनांक ३०/०८/२०१८ पासून सुरुवात झाली आहे. अर्थात हा १८० दिवसांचा कालावधी कार्यवाही पूर्ण करण्याकरीता मिळतो. म्हणजे हा कार्यकाल फेब्रुवारी, २०१९ पर्यंत असेल. तथापि, कमिटी ऑफ क्रेडिटर्स (बँकेची समिती) यात फ्लॅटधारकांचाही समावेश असेल. या समितीच्या संमतीने हा कार्यकाल ९० दिवसांनी म्हणजे मे, २०१९ पर्यंत वाढवता येईल. या कालावधीत नवीन गुंतवणूकदार न मिळाल्यास कंपनी दिवाळखोरीत निघते. फ्लॅटधारकांना नवीन गुंतवणूकदारांबरोबर झालेला करार किंवा दिवाळखोरीतील नियम व तरतूद यानुसार त्यांचा हिस्सा मिळतो.

(३) नादारी व दिवाळखोरी (आयबीसी) कायद्यांतर्गत कार्यवाही सुरु झालेली असल्याने कोणत्याही ग्राहकाला पैसे परत मिळालेले नाहीत.

नादारी व दिवाळखोरी कायद्यांतर्गत प्रक्रिया सुरु होण्यापूर्वी म्हणजे ३०/०८/२०१८ च्या पूर्वी लवासा कंपनीने बँकाना पुनर्बांधणीचे काही पर्याय सादर केले होते. पण बँकांनी ते स्विकारले नाहीत.

(४) सोडवणूक योजना तयार करण्याचे काम सध्या सुरु असून ते नादारी व दिवाळखोरी संहितेत नमूद केलेल्या कालावधीप्रमाणे आहे.

---

## जयगड (ता.जि.रत्नागिरी) येथील ऐतिहासिक कऱ्हाटेश्वर मंदिराकडे जाणारा पारंपारिक मार्ग जिंदल कंपनीने बंद केल्याबाबत

**(२७) ४४२३२ (०२-११-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.सुभाष झांबड,**

**डॉ.वजाहत मिर्झा, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जयगड (ता.जि.रत्नागिरी) येथील ऐतिहासिक कऱ्हाटेश्वर मंदिराकडे जाणारा पांरपारिक मार्ग जिंदल कंपनीने बंद केल्यामुळे ग्रामस्थांची गैरसोय होत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नांदिवडे येथील संदखोल, भंडारवाडी, कुणबीवाडी, आंबुवाडी या वाड्यातील दिंड्या ज्या पाखाडीने मंदिराकडे जातात ती पाखाडी जिंदल कंपनीने सन २०१० मध्ये बंद करणार नसल्याचे हमीपत्र देऊनही तसेच सदरहू प्रकरणी न्यायप्रविष्ट असूनही कंपनीने पाखाडी बंद केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१), (२), (३), व (४) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण क्रमांक : जिपर २९०९/प्र.क्र.२९९/पंरा-८, दिनांक १२/०१/२०१० नुसार मौजे कुणबीवाडी, ता.जि.रत्नागिरी येथील श्री कऱ्हाटेश्वर मंदिराकडे जाणारा ग्रामीण मार्ग क्र.२६ हा रस्ता कायमस्वरुपी बंद करुन जेएसडब्ल्यू जयगड पोर्ट लि. या कंपनीला कायमस्वरुपी हस्तांतरण करण्याबाबत व पर्यायी रस्ता वापरण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार कऱ्हाटेश्वर मंदिराकडे जाणाऱ्या रस्त्याची जागा कंपनीकडे हस्तांतरीत केली असून त्या बदल्यात कंपनीने उपलब्ध करुन दिलेला पर्यायी पक्का रस्ता जिल्हा परिषद, रत्नागिरी यांच्याकडे वर्ग केलेला आहे. सदर पर्यायी रस्त्यावर पथ दिवे, पदपथ, नागरिकांसाठी दिवसरात्र मोफत वाहनसेवा या सुविधा कंपनीने उपलब्ध करुन दिलेल्या आहेत.

कंपनीने पर्यायी रस्ता उपलब्ध करुन दिलेला असल्यामुळे मौजे कुणबीवाडी सर्व्हे क्र. ३३, ३६ व ३७ या मिळकती लगत बिननंबरी सडक म्हणून अस्तित्वात असलेले एकूण क्षेत्र ०/१६/० हे.आर.तसेच मौजे कुणबीवाडी सर्व्हे क्र. ३०/१३, ३१/११ व ३२/१२ एकूण क्षेत्र ०/८४/० हे.आर. पूर्वीच्या

रस्त्याखालील (पाखाडी) क्षेत्राची मागणी कंपनीने केल्यानुसार शासनाच्या महसूल व वन विभागाचा अनुक्रमे दिनांक १३/०६/२०१४ व दिनांक १८/०३/२०१६ च्या शासन ज्ञापनास अनुसरुन जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे अनुक्रमे दिनांक १२/०६/२०१५ व दिनांक ३०/०४/२०१६ च्या आदेशान्वये कब्जेहक्काची रक्कम वसूल करुन उक्त जमीन कंपनीस मंजूर करण्यात आली.

उक्त आदेशानंतर श्री.प्रथमेश कृष्णा शिरधनकर व इतर रा. नांदीवडे यांनी दिवाणी न्यायाधिश (वरिष्ठ स्तर), रत्नागिरी यांच्या न्यायालयात पाखाडी रस्ता बंद न करण्याबाबत दावा दाखल केला असून दिनांक २१/०७/२०१७ च्या अंतरिम आदेशान्वये तुर्तातुर्त मनाईचा दावा मा.न्यायालयाने फेटाळला असून सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.

कंपनीने नागरिकांना पर्यायी रस्ता उपलब्ध करुन दिल्यामुळे, शासनाने पाखाडी रस्त्याची जमीन कंपनीस कब्जेहक्काने हस्तांतरीत केल्याने तसेच दिवाणी न्यायाधिश (वरिष्ठ स्तर), रत्नागिरी यांनी तुर्तातुर्त मनाईचा दावा फेटाळल्यामुळे व कंपनीने नोटरीसमोर केलेले हमीपत्र शासनाकडून कब्जेहक्काने जमीन प्रदान करण्यापूर्वीचे असल्याने कंपनीने पाखाडी रस्ता बंद केल्याचे दिसून येते.

---

## भानगांव (ता.श्रीगोंदे, जि.अहमदनगर) येथे आदिवासी महिलेला मारहाण केल्याबाबत

**(२८) ४४२३६ (३०-१०-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.आनंद ठाकूर, श्री.सतिश चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भानगांव (ता.श्रीगोंदे, जि.अहमदनगर) येथे दिनांक १२ सप्टेंबर, २०१८ रोजी एका आदिवासी महिलेला विवस्त्र करुन मारहाण करण्यात आल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर महिला श्रीगोंदा पोलीस ठाणे येथे तक्रार दाखल करण्यास गेली असता पोलिसांनी तक्रार दाखल करुन घेतली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.
(३) फिर्यादीने दिलेल्या तक्रारीवरून श्रीगोंदा पोलीस स्टेशन, जि.अहमदनगर येथे गु.र.नं. ४६०/२०१८ भा.दं.वि.का. कलम १४७, १४८, १४९, ३५४, ३२४, ३२३, ५०४, ५०६, ५०९, ३४, अनुसूचित जाती जमाती कायदा कलम ३(१)(W)(i), ३(१)(W)(२), ३(२)(v)(a), ३(१)(e) अंतर्गत शेतमालक आरोपीतांविरूध्द गुन्हा दाखल करण्यात आलेला आहे. मा.न्यायालयाने आरोपी क्र. १ ते ५ यांचा अटकपुर्व जामीन मंजूर केलेला आहे. सदर गुन्हा पोलीस तपासावर आहे.

फिर्यादी महिलेची फिर्याद नाकारून पो.नि.बाजीराव पोवार यांनी केलेल्या कसुरीबाबत त्यांची देय वेतनवाढ ३ वर्षाकरीता स्थगित करणबाबत पोलीस अधिक्षक कार्यालयाकडून विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक यांना शिफारस करण्यात आलेली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अंगणवाड्या बंद होण्याच्या मार्गावर असल्याबाबत

**(२९) ४४२३९ (०३-११-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.विक्रम काळे, प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) “बजेट वाढवा अंगणवाडी वाचवा” या प्रमुख मागणीसह अंगणवाडी कर्मचारी कृती समितीने दिनांक २५ सप्टेंबर, २०१८ रोजीपासून मुंबईतील आझाद मैदानावर राज्यव्यापी आंदोलनाची हाक दिली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाने दिनांक १६ जुलै, २०१८ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामुळे राज्यातील सुमारे २७ हजारांहून अधिक अंगणवाड्या बंद

होण्याच्या मार्गावर असून त्याचा परिणाम संबंधित विभागातील लहान मुलांसह स्तनदा मातांवर होणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या निर्णयानुसार राज्यातील ज्या अंगणवाड्यांमध्ये ३ ते ६ वयोगटातील २५ हून कमी मुले आहेत त्या बंद करुन शेजारील अंगणवाडी केंद्रात समायोजन करण्याच्या धोरणाविरुध्द उस्मानाबाद जिल्हा परिषदेच्या कार्यालयासमोर अंगणवाडी सेविकांनी मोर्चा काढून धरणे आंदोलनही केले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, ग्रामीण भागामध्ये दोन अंगणवाड्यांमध्ये बराच कि.मी. अंतर असल्यामुळे शासनाच्या या निर्णयामुळे पोषण आहारासह सर्वच योजनांचा लाभ मुलांना मिळणार नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाकडून अंगणवाडी कर्मचाऱ्यांच्या मागण्यांबाबत निर्णय घेण्यास विलंब होण्याची सर्वसाधारण कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे नाही. शासनस्तरावरुन अंगणवाड्या बंद करण्याबाबतचा कोणताही निर्णय झालेला नाही.

तसेच महिला व बालविकास विभागाचे शासन निर्णय क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.२०२/का-६, दिनांक ०८/१०/२०१८ अन्वये निती आयोगाचे महत्वाकांक्षी जिल्हे (नंदुरबार, गडचिरोली, उस्मानाबाद इ.) यामध्ये अंगणवाडी सेविका/मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविका यांची रिक्त पदे दिनांक ०१ नोव्हेंबर २०१८ पासून भरण्यास शासनाने मंजुरी दिलेली आहे. त्यानुसार उस्मानाबाद जिल्हायांतर्गत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मितनी अंगणवाडी सेविका यांची भरती प्रक्रिया सुरु करण्यात आलेली आहे. परिणामी कोणतेही लाभार्थी लाभापासून वंचित होणार नाहीत.

(३) होय, हे खरे आहे.

(४) व (५) हे खरे नाही. शासनस्तरावरुन अंगणवाड्या बंद करण्याबाबतचा कोणताही निर्णय झालेला नाही, त्यामुळे पोषण आहारासह सर्व योजनांचा लाभ मुलांना नियमित मिळणार आहे.

---

## नागपूर सुधार प्रन्यासच्या लॉजिस्टिक झोनबाबत

**(३०) ४४२४६ (०१-११-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर सुधार प्रन्यासने लॉजिस्टिक झोन जाहीर केले असून गोंडखैरी, पेंढरी, चिंचभुवनसोबत अमरावती रोडकरीता सुमारे ७०० ते ८०० कोटी रूपयांची योजना तयार करुन नागरिकांकडून सूचना व आक्षेप नोंदवून झोनचे चार तुकडे करुनही सदर योजनेच्या कामात कोणतीही प्रगती नसल्यामुळे नागपूर सुधार प्रन्यासच्या लॉजिस्टिक झोन बद्दलच्या कार्यपध्दतीवर सर्वसामान्यांमध्ये तसेच स्थानिक गुंतवणूकदारांमध्ये शंका निर्माण झाली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर लॉजिस्टिक हबला पायाभूत सोयी उपलब्ध करून देणे तसेच कॉन्कोर व इतर खाजगी कंपन्यांना रेल्वे आणि रोडव्दारे माल वाहतूक करण्यासाठी लागणारी साधने व इतर सोयी उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता असून शासनाच्या उदासिनतेमुळे सदर योजनेच्या कामांची गती मंदावली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) नागपूर सुधार प्रन्यासने मौजा गोंडखैरी-चिंचभुवन-पेंढरी मधील २०.३० चौ.कि.मी. जागेवर जनता सहयोग तत्वावर वाणिज्य प्रयोजनाकरीता (लॉजिस्टिक) सुधार योजना राबविण्यास मंजूरी दिली आहे व त्यानुषंगाने सदर योजनेत समाविष्ट जागांचे निरीक्षण, सर्व्हेक्षण मोजमापे लेवल घेणे, आखणी करणे व सर्व्हेक्षणाकरीता अन्य कामे करण्याकरीता नागपूर सुधार प्रन्यास, अधिनियम, १९३६ चे कलम ५४ व २५ अन्वये दिनांक २०/०१/२०१६ रोजी प्रसिध्द करण्यात आली होती.

शासन निर्णय क्र.ना.सु.प्र.२०१६/प्र.क्र.१३४/नवि-२६, दिनांक ०९/०२/२०१७ अन्वये शासनाने नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम, १९३६ च्या कलम १२१ मधील तरतुदीनुसार नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर ही स्वायत्त

संस्था नागपूर महानगर प्रदेश क्षेत्रासाठी बरखास्त करण्यात आलेली आहे. या क्षेत्रासाठी नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण हे नियोजन प्राधिकरण असल्याने उक्त प्रस्तावित सुधार योजना नागपूर सुधार प्रन्यास अधिनियमांतर्गत पुढे चालू ठेवल्यास कायदेशिर अडचणी उपस्थित होण्याची शक्यता असल्याने नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण सभेने ठराव क्र. ४/०१, दिनांक ०७/०६/२०१७ अन्वये टप्प्या टप्प्याने नगर रचना योजना राबविणेचा निर्णय घेतला.

नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने दिनांक १९/०१/२०१८ रोजी महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ६०(२) अन्वये मौजा गोंडखैरी तह. कळमेश्वर व मौजा पेंढरी तह. हिंगणा क्षेत्र ३७१.४१ हे.आर. (भाग-२) व मौजा गोंडखैरी तह. कळमेश्वर हिंगणा क्षेत्र ४०६.४५ हे.आर. (भाग-३) या दोन योजना प्रसिध्द केल्या आहेत.

प्रत्यक्षात मौजा गोंडखैरी चिंचभुवन पेंढरी येथे अंदाजे क्षेत्र २०.३० चौ.कि.मी. जागेवर एकूण ६ टप्या टप्प्याने योजना राबविणे नियोजनाच्या व उक्त क्षेत्रात सेवा सुविधा पुरविण्याचे दृष्टीने योग्य राहणार नाही. याकरीता संपूर्ण तिन्ही गावांचे क्षेत्राचा एकत्रितपणे विचार करुन नागपूर महानगर क्षेत्रातील प्राधिकरणाला नगर रचना योजनेच्या माध्यमातून प्राप्त होणाऱ्या जवळपास ४० टक्के जमिनीचा वापर योजनेतील मोकळी जागा, सार्वजनिक सोई सुविधा, परवडणारी घरे, नदी संवर्धन, रस्ते निवासी व वाणिज्य इत्यादी उपयोगासाठी करण्याचे प्रस्तावित आहे. त्यामुळे पायाभुत सुविधा जसे सांडपाणी वाहुन नेणाऱ्या नाल्या, रस्त्याचे जाळे, एस.टी.पी. इत्यादी बाबींवर विचार करुन सलग एकत्रित आराखडा तयार करण्याच्या दृष्टीने कार्यकारी समिती समोर प्रस्ताव मंजुरीकरीता सादर करण्याची कार्यवाही नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिरणाकडुन सुरु आहे.

(२) नाही. शासनाचे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील शासन निर्णय दिनांक १४/०२/२०१८ रोजीचा एकात्मिक लॉजिस्टिक पार्क (Integrated Logistic Parks) धोरणाचा विचार करुन नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाचा नगर रचना योजनेच्या माध्यमातुन लॉजिस्टिक पार्क राबविण्याचा मानस आहे. त्यानुसार नगर रचना योजना तयार करण्याचे काम नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून चालू आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) नाही.

---

## राज्यातील विनाअनुदानित शाळा व वर्ग तुकड्या यांचे मुल्यांकन करण्याबाबत

**(३१) ४४२५८ (०१-११-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ४१७०० ला दिनांक ९ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात खाजगी व्यवस्थापनाच्या शाळा व वर्ग तुकड्या अनुदानावर आणण्यासाठी विहित कालावधी पूर्ण झाल्यानंतर दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ च्या शासन आदेशाने मुल्यांकन केले जात असून राज्यात सन २०१२ मध्ये अनुदानित शाळांमध्ये विद्यार्थी संख्या वाढीमुळे सुमारे ५९७२ वर्ग तुकड्यांना विनाअनुदानित तत्वावर मान्यता देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक ३० मे, २०१८ च्या शासन आदेशाने नवीन शाळा व वर्ग तुकड्या अनुदानावर आणण्यासाठी व मुल्यांकन करण्यासाठी वित्त विभागाची परवानगी घेण्याची अट घालण्यात आली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर शाळा व वर्ग तुकड्या यांना मुल्यांकन करण्यासाठी निधीची गरज नसताना, वित्त विभाग परवानगी देत नसल्याने सन २०१२ ला मिळालेल्या वर्ग तुकड्या यांचे मुल्यांकन करण्यात आले नसल्याने सदर वर्ग तुकड्यांचे मुल्यांकन करण्याबाबत विविध संघटना व लोकप्रतिनिधी यांच्याकडून मागणी केली जात आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शासन आदेशातील अट रद्द करून सन २०१२ ला मिळालेल्या वर्ग तुकड्यांचे मुल्यांकन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१९-११-२०१८) :** (१) मुल्यांकनाबाबत शासन निर्णय, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ व दिनांक १६ जुलै, २०१३ अन्वये निकष विहित केले

आहेत. तसेच सन २०१२ मध्ये ५९७२ तुकड्यांना विनाअनुदानित तत्वावर मान्यता देण्यात आली आहे.

(२) नाही. मुल्यांकनानुसार अनुदानासाठी पात्र ठरलेल्या शाळांना अनुदानास पात्र घोषित करण्यासाठी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

(३) याबाबत विविध संघटना व लोकप्रतिधिनी यांचेकडून निवेदने प्राप्त झाली आहेत.

(४) वर्ग/तुकड्यांच्या मुल्यांकनाबाबत योग्य ती कार्यवाही करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## गडचिरोली जिल्हयात 'माझी कन्या भाग्यश्री' योजनेच्या लाभार्थ्यांना अनुदानाची रक्कम मिळण्याबाबत

**(३२) ४४२८५ (०३-११-२०१८). श्री.रामदास आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गडचिरोली जिल्हयात 'माझी कन्या भाग्यश्री' योजनेच्या लाभासाठी २ हजार ३७८ आवेदन पत्र प्राप्त झाली असता त्यापैकी २४१ लाभार्थ्यांना पात्र ठरविण्यात आले असून त्यांना अद्याप अनुदानाची रक्कम मिळाली नसल्याचे दिनांक १७/९/२०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर योजनेची रक्कम लाभार्थ्यांना मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) व (२) गडचिराली जिल्हयाला सन २०१७-१८ मध्ये रुपये १३२.७५ लक्ष रुपये प्राप्त झाले होते.

जुनी माझी कन्या भाग्यश्री योजनांतर्गत प्राप्त झालेल्या अर्जांपैकी दिनांक ०१/०८/२०१७ च्या शासन निर्णयातील निकषानुसार ४१७ लाभार्थी पात्र ठरले. त्यापैकी १९६ लाभार्थीना योजनेचा लाभ मंजूर करण्यासाठी बँक ऑफ महाराष्ट्र, गडचिरोली यांच्याकडे प्रस्ताव सादर करण्यात आले होते त्यापैकी आजपर्यंत १३३ लाभार्थींचे मुदतठेव प्रमाणपत्र प्राप्त झाले असून लाभार्थीना

वाटप करण्यात आलेले आहेत. उर्वरीत लाभार्थींना मुदतठेव प्रमाणपत्र देण्याची कार्यवाही सुरु आहे.
(३) माझी कन्या भाग्यश्री योजनेचा मुदत ठेवीव्दारे देण्यात येणारा लाभ बँक ऑफ महाराष्ट्र मार्फत देण्यात येत आहे. लाभ देण्यासाठी लाभार्थींचे बँक ऑफ महाराष्ट्र मध्ये खाते असणे अनिवार्य आहे. परंतु खाते उघडण्यास लाभार्थींकडून विलंब होत असल्यामुळे मुदत ठेवीचा लाभ देण्यात उशीर होत आहे.

---

## रत्नागिरी-रायगड या जिल्ह्यांना जोडणाऱ्या आंबेत-म्हाप्रळ पुलाची दुरवस्था झाल्याबाबत

**(३३) ४४३३५ (३१-१०-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रत्नागिरी-रायगड या जिल्ह्यांना जोडणाऱ्या आंबेत-म्हाप्रळ खाडीवरील पुल धोकादायक व कमकुवत झाल्याने नव्याने पुल उभारणी करण्याची मागणी लोकप्रतिनिधी व स्थानिक नागरीक मागील २ वर्षापासून सातत्याने मा.मुख्यमंत्री, मा.सार्वजनिक बांधकाम मंत्री व सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्याकडे लेखी निवेदनाद्वारे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू पुलाला धोका निर्माण झाला असल्याचे सार्वजनिक बांधकाम विभाग, महाड यांनी पुलाच्या दोन्ही बाजूला फलक लावले असूनही या खाडीतून रात्रीच्यावेळी अवैधरित्या वाळू उत्खनन सुरु असल्याने पुलाचा धोका वाढून दुर्घटना होण्याची शक्यता निर्माण झाल्याची बाब लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्र्यांकडे सादर केलेल्या निवेदनात व्यक्त केले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू पुलाची पुनर्बांधणी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०६-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) सदर पुलाखालून बार्जची वाहतूक होत असल्याने, बार्ज पुलाच्या कॉंक्रीट पिअरला धडकून नुकसान होऊ नये म्हणून गाळयाच्या दोन्ही बाजूच्या पियर्सला रबरी फेंडर्स बसविण्याचे काम प्रगती पथावर आहे.

(३) व (४) मागणीकृत पुलाच्या पुनर्बांधणीचे काम निकष, मंजूरी व निधी उपलब्धतेच्या अधीन राहून हाती घेण्याचे नियोजन राहील.

---

## विदर्भातील सिंचन प्रकल्पांबाबत

**(३४) ४४३८९ (०३-११-२०१८). श्री.रामदास आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, अ‍ॅड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) विदर्भातील सिंचन प्रकल्पांचा अहवाल दोन आठवड्यात सादर करण्याचे आदेश मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने विदर्भ सिंचन विकास महामंडळाला दिल्याचे दिनांक ६/९/२०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जलसंपदा विभागासाठी ४ हजार २३३ कोटी रुपयांच्या निधीची तरतूद केली असून सदर निधीमधून विदर्भातील किती जिल्ह्यात सिंचनाचे प्रकल्प हाती घेण्यात आले व त्यासाठी किती निधी खर्च करण्यात आला आहे,

(३) असल्यास, आणखी किती सिंचन प्रकल्पांची कामे प्रस्तावित आहेत व त्यावर किती खर्च अपेक्षित आहे,

(४) असल्यास, गोसीखुर्द राष्ट्रीय प्रकल्प माहे जून, २०१७ मध्ये पूर्ण होणार असल्याचे विदर्भ सिंचन मंडळाने नमूद केले असतानाही सदर प्रकल्प पूर्ण न होण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२०-११-२०१८) :** (१) होय.

मा.उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ यांनी PIL १२/२०१६ (जनमंच) या न्यायालयीन प्रकरणी महामंडळांर्गतच्या बांधकामाधीन प्रकल्पांची

जून २०१८ अखेरची प्रकल्प निहाय सद्य:स्थिती (Status Report) सादर करणे बाबत निर्देश दिनांक ०६/०९/२०१८ रोजीच्या सुनावणीत दिले आहेत. या अनुषंगाने महामंडळांतर्गत बांधकामाधीन प्रकल्पांची जून, २०१८ अखेरची प्रकल्प निहाय सद्य:स्थिती (Status Report) प्रतिज्ञापत्राद्वारे (Affidavit) दिनांक २६/०९/२०१८ रोजी मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर येथे दाखल करण्यात आली आहे.

(२) सन २०१८-१९ करीता विदर्भातील प्रकल्पांकरीता रुपये २८२६.०४ कोटी इतकी तरतूद केली आहे. तसेच महामंडळाकडे सन २०१७-१८ अखेर शिल्लक रुपये १४७२.६० कोटी विचारात घेता सन २०१८-१९ करीता एकूण रुपये ४२९८.६४ कोटी निधी २०७ प्रकल्पांकरीता उपलब्ध आहे. माहे ऑक्टोबर, २०१८ अखेर उपलब्ध निधी पैकी रुपये १८६०.८४ कोटी इतका खर्च झाला आहे.

(३) विदर्भात ३१४ बांधकामाधीन सिंचन प्रकल्प असून, पैकी जून, २०१८ अखेर १२६ प्रकल्प पूर्ण (किरकोळ खर्च शिल्लक) झालेले आहेत व १० प्रकल्प जवळपास पूर्ण झाले आहेत. ७ प्रकल्पांचा प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजना व ६९ प्रकल्पांचा केंद्र शासन अर्थसहाय्यित विशेष पॅकेज मध्ये (बळीराजा जलसंजीवनी योजना) समावेश आहे. उर्वरित १२२ प्रकल्पांपैकी ६० प्रकल्प प्रगतीपथावर असून २ प्रकल्पास नुकतीच प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेली आहे. १४ प्रकल्प वनजमीन अडचणीमुळे प्रलंबित आहेत. १३ प्रकल्प वनजमीन मान्यते अभावी, ७ प्रकल्प इतर अडचणीमुळे रद्द करण्यात प्रस्तावित आहेत व ६ प्रकल्प जलसंधारण विभागास हस्तांतरीत करण्यात आलेली आहेत. बांधकामाधीन प्रकल्पांची मार्च २०१८ अखेरची उर्वरीत किंमत रुपये ५२७३३.८९ कोटी आहे.

(४) गोसीखुर्द प्रकल्पाची कामे खालील महत्वाच्या कारणांमुळे पूर्ण होऊ शकली नाहीत.

१) सन २०१२ पर्यंत प्रकल्पाचा खर्च मंजूर सु.प्र.मा पेक्षा जास्त झाल्यामुळे पुढील सु.प्र.मा.नसल्याने वाढीव खर्च करणे शक्य नव्हते.

२) प्रकल्पबाधितांकडून पुनर्वसनाकरीता होत असलेल्या विरोधामुळे प्रकल्पात आवश्यक जलसाठा निर्माण करता आला नाही.

३) मागील पाच वर्षात सन २०१७-१८ मध्ये केंद्र शासनाकडून केंद्रिय अर्थसहाय्य प्राप्त झाले आहे.
४) भूसंपादनामधील अडचणीमुळे अपेक्षित गतीने कामे होऊ शकली नाही.
५) चालू कामाच्या निविदा अर्धवट स्थितीत अंतिम केल्याने उर्वरित कामासाठी नव्याने निविदा मागविणे आवश्यक झाले.

---

## मुंबई महानगरपालिकेच्या शाळांमध्ये शासनाच्या परवानगी शिवाय इयत्ता ९ वी व १० वीचे वर्ग सुरु करण्यात आल्याबाबत

**(३५) ४४४०२ (०१-११-२०१८). श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई महानगरपालिकेच्या शाळांमध्ये शासनाच्या परवानगी शिवाय इयत्ता ९ वी व १० वीचे वर्ग सुरु करण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाच्या नियमानुसार १ कि.मी.च्या अंतरावर नवीन माध्यमिक शाळेस परवानगी देता येत नसताना मनपाने शासनाच्या परवानगी शिवाय भाषिक माध्यमाच्या पाच शाळा आणि एल वॉर्ड, एम वॉर्ड, आणि एस वॉर्ड मध्ये इयत्ता ९ वी व १० वीचे वर्ग सुरु केले आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त परिसरातील खाजगी माध्यमिक शाळा विद्यार्थ्यां अभावी बंद झाल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, संबंधित अनधिकृत शाळांवर शासनाने चौकशी करुन काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.

शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक ११ जून, २००९ रोजीच्या शासन निर्णयानुसार, माध्यमिक शाळेचे वर्ग स्वत:च्या उत्पन्नातून व शासनावर कोणतेही आर्थिक दायित्व न येता स्थानिक स्वराज्य संस्था सुरु करु इच्छित

असतील तर इयत्ता ८ वी ते १२ वी चे वर्ग सुरु करण्यास यापुढे शासन स्तरावरुन राज्य शासनावर कोणताही आर्थिक भार येणार नाही या अटीच्या अधीन राहून परवानगी देण्यात येते.

सदर शासन निर्णयानुसार, सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षामध्ये बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या इंग्रजी माध्यमाच्या मुंबई पब्लिक स्कूल मधून इयत्ता ९ वी चे वर्ग सुरु करण्यास, तसेच सदर शाळा माध्यमिक शाळा म्हणून सुरु करण्यास शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग यांनी कार्यवाही करण्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेस कळविले आहे.

त्यानुसार सन २०१५-१६ ते २०१८-१९ पर्यंत एकूण ४८ शाळांमधून नैसर्गिक वाढीने इयत्ता ९ वी व इयत्ता १० वी चे वर्ग सुरु आहेत.

(२) व (३) शालेय व्यवस्थापन समिती, पालक, व लोकप्रतिनिधी यांच्याकडून सातत्याने होणारी मागणी, भौतिक सुविधांसह शाळांमधील उपलब्ध वर्गखोल्या आणि शाळेच्या परिसरात उपलब्ध नसणारी महानगरपालिकेची संबंधित माध्यमाची माध्यमिक शाळा किंवा स्थानिक निकड या बाबी विचारात घेऊन विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये याकरीता परिस्थितीनुरुप सन २००८-०९ ते सन २०१८-१९ या कालावधीत नवीन माध्यमिक शाळा (मुंबई पब्लिक स्कूलसह) सुरु करण्यात आल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कुरगाव-तारापूर (ता.जि.पालघर) सागरी महामार्गाची दुरवस्था झाल्याबाबत

**(३६) ४४४०८ (३१-१०-२०१८). श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कुरगाव-तारापूर (ता.जि.पालघर) सागरी महामार्गाच्या दुरुस्तीचे काम नागझरी भागात असलेल्या जिजाऊ बांधकाम कंपनीला देण्यात आले असून सदर महामार्गाच्या दुरुस्तीच्या कामाकरीता शासनाने रुपये २ कोटी ६६ लाख

खर्च करुन डांबरीकरण करण्यात आलेल्या महामार्गाची पहिल्याच पावसात दुरवस्था झाल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने निकृष्ट दर्जाचे काम करणारे ठेकेदार व सदरहू कामाकडे दुर्लक्ष करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.

पालघर तालुक्यातील झाई बोर्डी रेवस रेड्डी सातर्डे रस्ता प्ररामा क्र. ४ वरील कि.मी. ३६/४२० ते ४३/७०० लांबीतील नुतनीकरणाचे काम एप्रिल-मे महिन्यात पूर्ण करण्यात आले असून कि.मी. ४२/१०० ते ४२/७५० लांबीमधील रस्त्याचा डांबरी पृष्ठभाग काही ठिकाणी अंशत: खराब झालेला होता. अंशत: खराब झालेला सदर रस्त्याचा भाग ठेकेदारामार्फत पूर्ववत करण्यात आला असून सद्य:स्थितीत सदर रस्ता सुस्थितीत आहे.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सिंधुदुर्ग जिल्हयातील घाट रस्त्यांच्या सुरक्षिततेच्यादृष्टीने उपाययोजना करण्याबाबत

**(३७) ४४४०९ (३१-१०-२०१८). श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सिंधुदुर्ग जिल्हयात रामघाट (ता.दोडामार्ग), आंबोलीघाट, केसरी-फणसवडे रस्ता (ता.सावंतवाडी), फोंडाघाट (ता.कणकवली) तर करूळ व गगनबावडा घाट (ता.वैभववाडी) असे घाटमार्ग असून दरवर्षी पावसाळ्यात सदरहू घाटामध्ये दरड कोसळून वाहतूक कोंडी होत असून तसेच अपघात देखील झाले असून दरडी कोसळणे आणि अपघात होण्याच्या प्रकारात सतत वाढ होत असल्याने घाटरस्ते आणि सुरक्षितता यांचा विचार होण्याची तसेच

त्यासाठी तज्ञ मंडळीकडून घाटरस्त्यांचा सर्व्हे करुन सुरक्षिततेसाठी बांधकाम विभाग उपाययोजना करीत नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू घाट रस्ता सुरक्षिततेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१७-११-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

प्रश्नाधीन सिंधुदुर्ग जिल्ह्यातील कणकवली तालुक्यातील करुळ घाट, भुईबावडा घाट, फोंडा घाट हे तीनही घाट देखभाल दुरुस्तीसाठी सा.बां.विभाग, कुडाळ, मु.कणकवली तसेच आंबोली घाट सा.बां.विभाग, सावंतवाडी यांचे अखत्यारीत आहेत.

सदर सर्व घाटातील रस्ते सुरक्षिततेबाबत या लांबीमध्ये संरक्षक भिंती, क्रॅश बॅरीअर तसेच आंबोली घाटात लोखंडी जाळी बसविणे इ. कामे करण्यात आली आहेत. सद्य:स्थितीत सदरचे घाट रस्ते वाहतुकीस सुस्थितीत आहेत. केसरी फणसवडे रस्त्यावरील कि.मी. ९/४०० ते १९/४०० या लांबीतील घाट रस्त्यासाठी भूसंपादनाबाबतची कार्यवाही प्रगतीत आहे.

तसेच प्रश्नांकित रामघाट (तिलारी घाट) हा देखभाल व दुरुस्तीसाठी अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, कोल्हापूर यांच्या अखत्यारीत आहे. सदर घाटाच्या संरक्षक भिंतीचे काम मंजूर असून माहे डिसेंबर, २०१८ मध्ये सदर काम सुरु करण्यात येणार आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## तळाशील सीसाईड (ता.मालवण, जि.सिंधुदुर्ग) येथील समुद्र धूपप्रतिबंधक बंधाऱ्याचे काम करण्याबाबत

**(३८) ४४४१२ (३१-१०-२०१८). श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पात ४७११, पूरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च अंतर्गत तळाशील सीसाईड (ता.मालवण, जि.सिंधुदुर्ग) येथील समुद्र धूपप्रतिबंधक बंधाऱ्याच्या रुपये १ कोटी ८० लाख रुपयांच्या अंदाजित खर्चास मंजुरी देऊन रुपये ९ लाखाची आर्थिक तरतूद करण्यात आलेली असतानाही समुद्र धूपप्रतिबंधक बंधाऱ्याच्या प्रकल्पाचे काम सुरु झाले नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन समुद्र धूपप्रतिबंधक बंधाऱ्याच्या प्रकल्पाचे काम सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) सदर कामास पर्यावरण विभगाची मंजूरी मिळण्यासाठी सल्लागाराची नियुक्ती करण्यात आली असून सदर कामांना मंजूरी मिळण्यासाठीचा अहवाल तयार करण्याची कार्यवाही सुरु आहे. सदर कामांचे काटछेद मिळण्यासाठी केंद्रीय जल व विद्युत संशोधन संस्था (CWPRS), पुणे यांना कळविण्यात आले आहे. पर्यावरण विभागाची परवानगी मिळताच निधीच्या उपलब्धतेनुसार काम हाती घेऊन पूर्ण करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## चेंबुर येथील माहूल गाव परिसरात एम.एम.आर.डी.ए. कडून बांधलेल्या सदनिका दलालांनी परस्पर विकल्याबाबत

**(३९) ४४४६८ (०१-११-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.अनिकेत तटकरे, श्री.सतिश चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) चेंबुर येथील माहूल गाव परिसरात एम.एम.आर.डी.ए. कडून शहरातील प्रकल्प बाधितासाठी बांधलेल्या सदनिकांपैकी सुमारे तीनशे सदनिका महानगरपालिकेच्या एम पश्चिम विभागातील अधिकाऱ्यांना हाताशी धरुन दलालांनी परस्पर विकल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, माहूलगाव येथे बांधण्यात आलेल्या प्रकल्प बाधितांच्या इमारतीस मूलभूत सुविधा नसल्याने रहिवाशी या इमारतीमध्ये सदनिका घेण्यास तयार होत नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार दोषी अधिकारी व दलालांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे, तसेच सदर ठिकाणी सर्व प्रकारच्या मूलभूत सुविधा किती दिवसात पुरविण्यात येणार आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) ३०० सदनिकांची परस्पर विक्री करण्यात आली ही बाब खरी नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेने कळविले आहे.

तथापि, “पालिकेच्या घरांची परस्पर विक्री” अशा आशयाची बातमी दिनांक २४/०१/२०१८ रोजीच्या वृत्तपत्रात प्रसिध्द झाली होती.
(२) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या विविध प्रकल्पाने बाधित व धोकादायक इमारतींमधील कुटुंबांच्या पुनर्वसनाकरीता माहूल येथील सदनिकांचे वितरण करण्यात येते.

महानगरपालिकेने वितरीत केलेल्या सुमारे १०,००० सदनिकांपैकी ५६१० सदनिकांमध्ये प्रत्यक्ष रहिवाशी वास्तव्य करीत आहेत.

सद्य:स्थितीत या इमारतींतील रहिवाशांना महानगरपालिकेमार्फत खालील सेवा व सुविधा पुरविण्यात येत आहेत :-

- २४ तास पाणीपुरवठा करण्यात येतो.
- रिलायन्स एनर्जीतर्फे २४ तास वीज पुरवठा करण्यात येतो.
- किटक नियंत्रण विभागामार्फत नियमितपणे धुम्र फवारणी केली जाते.
- इमारतींच्या परिसरातील कचरा महानगरपालिकेमार्फत नेमण्यात आलेल्या संस्थेमार्फत नियमितपणे उचलण्यात येतो.
- सार्वजनिक आरोग्य केंद्र व दवाखाना सुरु करण्यात आला असून २ वैद्यकीय अधिकारी नियुक्त करण्यात आले आहेत. तसेच, सदर परिसरात आवश्यकतेनुसार आरोग्य शिबिराचे आयोजन केले जाते.

- महानगरपालिकेच्या आरोग्य विभागामार्फत नियमितपणे आरोग्य सर्वेक्षण करण्यात येत असून, सदर सर्वेक्षणात तापाचे रुग्ण आढळल्यास त्यांच्यावर वेळोवेळी उपचार केले जातात.
- सदर इमारतींमध्ये सदनिका वाटप केल्यानंतर आवश्यकतेनुसार किरकोळ दुरुस्तीची कामे वेळोवेळी करण्यात येतात.
- सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात सदर इमारतींच्या सर्वंकष दुरुस्तींतर्गत स्थापत्य व विद्युत कामांकरीता महानगरपालिकेमार्फत रुपये ३५ कोटींची तरतूद करण्यात आली असून, दुरुस्तीचे काम सुरु करण्यात आले आहे.

(३) सदर प्रकरणी प्राप्त तक्रारींच्या अनुषंगाने बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत तपासणी मोहिमेंतर्गत तपासणी केली असता, १८ घुसखोरांनी प्रत्यक्ष घुसखोरी केल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या निदर्शनास आले आहे.

सदर प्रकरणी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत खालीलप्रमाणे कारवाई करण्यात आली आहे:-

- घुसखोरी केलेल्या १८ सदनिका रिक्त करुन ताब्यात घेण्यात आल्या आहेत.
- बनावट कागदपत्रांच्या आधारे घुसखोरी केलेल्या इसमांविरुध्द आर.सी.एफ. पोलीस ठाणे येथे दिनांक १३/११/२०१७, २७/११/२०१७ व २१/१२/२०१७ रोजी तक्रारी दाखल करण्यात आल्या असून सदर प्रकरणी पोलीस तपास सुरु आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## समतानगर, कांदिवली येथील म्हाडाच्या मालकीचा भुखंड मे.एस.डी. कॉर्पोरेशने तारण ठेवून कर्ज बँकेकडून घेतल्याबाबत

**(४०) ४४४७४ (३०-१०-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) समतानगर, कांदिवली येथील ५३ एकरचा म्हाडाच्या मालकीचा भुखंड मे. एस.डी. कार्पोरेशन या विकासकाने तारण ठेवून एक हजार कोटीचे कर्ज बँकेकडून घेतल्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री तसेच अप्पर मुख्य सचिव, गृहनिर्माण यांच्यामार्फत चौकशी करण्याबाबत पत्रव्यवहार करुन सदर बाब निदर्शनास आणून दिली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर विकासकाने एकत्रित पुनर्विकासास फक्त ४७ सोसायट्यांची संमती असताना बनावट कागदपत्रांच्या आधारे ८० सोसायट्यांची संमती दर्शवून शासनाची व रहिवाश्यांची फसवणूक करुन म्हाडाच्या जमिनीवर नियमबाह्यपणे बांधलेल्या इमारती मधील सदनिकांची विक्री करुन कोट्यवधीचा नफा कमविला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार सदर प्रकल्प विकासकाकडून काढून घेवून त्यास स्थगिती देण्याबाबत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१९-११-२०१८) :** (१) मा.श्री.धनंजय मुंडे, विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद यांचे या संदर्भातील दिनांक ०६/०९/२०१८ रोजीचे पत्र शासनास प्राप्त झाले आहे.
(२) सदर प्रकल्पाचे विकासक मे.एस.डी. कॉर्पोरेशन यांच्या पुनर्निरीक्षण अर्जाच्या अनुषंगाने सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम क्र.१५४ अन्वये तत्कालीन मा.मंत्री सहकार, महाराष्ट्र शासन यांनी दिनांक १२/११/२०१३ रोजी ४७ ऐवजी एकूण ६३ संस्थांची अर्जदार मे. एस. डी. कॉर्पोरेशन यांच्या नेमणूकीस संमती असल्याची वस्तुस्थिती कायम करण्यात येत आहे, असे आदेश पारीत केलेले आहेत. त्यानुसार म्हाडाने समतानगर युनियनमार्फत सुरु असलेल्या पुनर्विकासास ना-हरकत प्रमाणपत्र देण्याची कार्यवाही करण्यात आल्याचे म्हाडाने कळविलेले आहे. सदर प्रकल्पात सुमारे १३६८ पुनर्वसन सदनिका व ३५० विक्री सदनिकांचे बांधकाम पूर्ण झालेले आहे.

समतानगर युनियनकडून म्हाडास प्राप्त अहवालानुसार विक्री चटईक्षेत्र निर्देशांकावर विकासकाचे हक्क असून सदर विकास हक्क संबंधित

विकासकाने HDFC बँकेकडे गहाण ठेवले असून म्हाडाच्या मालकीचा भुखंड गहाण ठेवण्यात आला नाही.

(३) सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने डिसेंबर, २०१७ च्या हिवाळी अधिवेशनात लक्षवेधी सूचना क्र. ४०० वरील चर्चेच्या अनुषंगाने मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांनी दिलेल्या आश्वासनानुसार सदर प्रकरण मा.अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली शिखर तक्रार निवारण समितीकडे सोपविले होते. मात्र सदर समितीच्या कार्यकक्षेबाबत सेंट्रल बँक ऑफ इंडियाने मुद्दा उपस्थित केल्याने त्या समितीने सदर प्रकरण मा.अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समिती / म्हाडा यांच्याकडे चौकशी करीता सोपविले. सचिव, उच्चस्तरीय समिती, म्हाडा यांच्याकडून दिनांक ०१/११/२०१८ रोजीच्या पत्रान्वये अहवाल शासनास पाठविण्यात आला असून सदर अहवाल शासनास दिनांक १३/११/२०१८ रोजी प्राप्त झाला आहे. सदर अहवालानुसार, उच्चस्तरीय समिती / म्हाडा यांनी याप्रकरणी सुनावणी घेऊन दिनांक १४/०९/२०१८ रोजी आदेश पारित केले आहेत व त्यामध्ये अंतिमत: खालीलप्रमाणे निष्कर्ष काढले आहेत :- “This committee does not find any infirmity in the permission granted by MHADA for integrated redevelopment of entire Samta Nagar Layout including Economic Weaker Section (EWS), Lower Income group (LIG), Middle Income group (MIG), Higher Income group (HIG) and open spaces, various reservations and etc. dully sanctioned by State Govt.”

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर महानगरपालिकेच्या शाळांमधील विद्यार्थ्यांमध्ये तंबाखू व तंबाखूजन्य पदार्थांचे व्यसन वाढल्याबाबत

**(४१) ४४४७८ (०१-११-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकीय दंत महाविद्यालय व रूग्णालयाच्या पथकाने नागपूर महानगरपालिकेच्या २४ शाळांमधील २१०५ विद्यार्थ्यांची मुख तपासणी केली

असता ७०२ विद्यार्थ्यांना म्हणजे ३३.३४ टक्के विद्यार्थ्यांमध्ये तंबाखू व तंबाखूजन्य पदार्थांचे व्यसन वाढले असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नागपूर महानगरपालिकेच्या शाळेच्या जवळील परिसरात पानठेले, तंबाखू व तंबाखूजन्य पदार्थ सर्रास विकले जात असल्यामुळे ते अल्पवयीन विद्यार्थ्यांना सहज उपलब्ध होत असून मोठ्यांच्या व्यसनाकडे आकर्षित झालेले अबोध मन, जाहिरातींचा प्रभाव आणि एकदा चव घेण्याचा मोह आदीं कारणांमुळे तंबाखू व तंबाखूजन्य पदार्थांच्या आहारी जाऊन परिणामी मुखाचा कर्करोग होण्याचे प्रमाण वाढल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे व त्याचे स्वरुप काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) सन २०१६-२०१७ व २०१७-२०१८ मध्ये शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालयाच्या पथकाने नागपूर महानगरपालिकेच्या शाळांमधील २१०५ विद्यार्थ्यांची दंत तपासणी केली असता रोग निदान झालेल्या विद्यार्थ्यांची संख्या खालीलप्रमाणे आहे.:-

| **रोगनिदान** | **विद्यार्थी संख्या** | **रोगनिदान** | **विद्यार्थी संख्या** |
|---|---|---|---|
| दातांना किड | ८०३ | तंबाखू, गुटखा सेवन | ७०२ |
| हिरड्यांचे आजार | ६६९ | मूखपूर्व कर्करोग | १८ |
| दातांना मार | ११५ | फ्लोरोसीरा | ५८ |
| मौखिक सवई | ८० | | |

(२), (३) व (४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, दिनांक ०७/०३/२०१५ नुसार शैक्षणिक संस्थांच्या १०० यार्ड परिसरात तंबाखू व तंबाखूजन्य पदार्थांच्या विक्रीस बंदी असून, त्यानुसार महानगरपालिकांच्या शाळांच्या परिसरात आवश्यकती कार्यवाही नागपूर महानगरपालिकेकडून करण्यात येत आहे.

अशा बाबीपासून परावृत्त करण्यासाठी शासनाकडून विविध जाहिरातीद्वारे, शाळांद्वारा विविध उपक्रम राबविणे, विविध तज्ञ मार्गदर्शकाकडून व्यसनाचे होणारे दुष्परिणाम यावर मार्गदर्शन करणे. वेळोवेळी मुख्य व दंत आरोग्यासंदर्भात शाळांमध्ये शिबीरे आयोजित करणे, यासंदर्भात योग्य ते वैद्यकीय उपचार करणे इ. बाबी केल्या जात आहेत.

यासाठी महापालिकेने आतापर्यंत सप्टेंबर, २०१७ ते सप्टेंबर, २०१८ अखेर २४ शिबीरांचे आयोजन केले आहे.

महानगरपालिकास्तरावर याबाबत वेळोवेळी प्रतिबंधात्मक व उपचारात्मक कार्यवाही करण्यात येत असल्याचे आयुक्त, नागपूर मनपा यांच्या अहवालात नमूद करण्यात आलेले आहे.

---

## महाविद्यालयातून वाहन परवाना वाटप करण्याबाबत

**(४२) ४४४९० (३१-१०-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.अनिकेत तटकरे :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील प्रादेशिक, उपप्रादेशिक व इतर विभागामार्फत वाहन चालविण्याचा शिकावू आणि कायमस्वरुपी परवाना मिळवण्यासाठी चालकांची मोठ्या प्रमाणावर होणारी गर्दी टाळण्यासाठी तसेच राज्य परिवहन महामंडळातून वाहन परवाना मिळवून देण्याच्या नावाखाली दलाल नागरीकांकडून हजारो रुपये उकळत असल्याने नागरिकांना कमीत कमी त्रासात परवाना मिळावा यासाठी महाविद्यालयांतून वाहन परवाना देण्याची घोषणा मा.परिवहन मंत्री यांनी माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना रस्ता सुरक्षेची माहिती व्हावी, यासाठी महाविद्यालयातून शिकवू परवाना देण्याची घोषणा करण्यात येवूनही त्याची अंमलबजावणी झाली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मुंबई आणि नाशिकमधील महाविद्यालयातून वाहन परवाना वाटपाचा राबविण्यात आलेला पथदर्शी प्रकल्प यशस्वी झाल्यानंतर या योजनेची संपूर्ण राज्यात अंमलबजावणी करण्याचे तत्कालीन परिवहन

आयुक्त, प्रविण गेडाम यांनी निश्चित केले असूनही त्यावर कोणतीही कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने महाविद्यालयातून वाहन परवाना वाटपाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (१७-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.

महाविद्यालयामध्ये शिकाऊ अनुज्ञप्ती संगणकीय चाचणी घेण्याकरीता परिवहन आयुक्त कार्यालयातर्फे निर्णय घेवून दिनांक २०/०७/२०१७ व त्यानंतर पुन्हा दिनांक ०२/०८/२०१८ रोजी सर्व परिवहन कार्यालयांना त्यानुसार कार्यनिर्देश देण्यात आलेले आहे. त्याचप्रमाणे राज्यातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरु यांना महाविद्यालयामध्ये शिकाऊ अनुज्ञप्तीची शिबिरे आयोजित करण्याबाबत सर्व महाविद्यालयांना निर्देश देण्याबाबत विनंती करण्यात आलेली आहे.

महाविद्यालयांमध्ये विद्यार्थांसाठी शिकाऊ अनुज्ञप्तीची शिबिरे आयोजित करण्याबाबत संबंधित महाविद्यांलयाकडून मागणी आल्यास संबंधित महाविद्यालयांमध्ये त्याप्रमाणे शिबिरे आयोजित करण्यात येतात. या योजनेंतर्गत अशा प्रकारची एकूण ३२ शिबिरे आयोजित करण्यात आलेली आहे.
(३) हे खरे नाही.

अशा पध्दतीचे कॅम्प आयोजित करण्याबाबत मुंबई, कल्याण, नाशिक, नागपूर यासारख्या शहरातील महाविद्यालयाकडून मागणी प्राप्त झाल्यानुसार शिबिरांचे आयोजन करण्यात आलेले आहे.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## तेलंगी जातीला केंद्राच्या इतर मागासवर्गीय प्रवर्गाच्या यादीत समाविष्ट करणेबाबत

**(४३) ४४४९४ (०२-११-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तेलंगी जातीला केंद्राच्या इतर मागासवर्गीय प्रवर्गाच्या यादीत समाविष्ट करणेबाबतच्या प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तेलंगी या जातीला केंद्राच्या इतर मागासवर्गीय (ओबीसी) प्रवर्गातील यादीत समावेश न केल्यामुळे त्यांच्यावर मोठा अन्याय होत असून केंद्र शासनाच्या अनेक योजना व सवलतीपासून वंचित रहावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तसेच सदर प्रस्तावावर केव्हापर्यंत अंमलबजावणी होणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१४-११-२०१८) :** (१), (२), (३) व (४) याबाबत राज्य मागासवर्ग आयोगाकडून अहवाल मागविण्यात आला आहे, राज्य मागासवर्ग आयोगाकडून अहवाल प्राप्त झाल्यावर अहवालावर योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

---

## मुंबईतील परळ विभागातील कॉलेज ऑफ फिजिशियन आणि सर्जन या महाविद्यालयातील बनावट डॉक्टराबाबत

**(४४) ४४५१४ (०३-११-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्रीमती स्मिता वाघ, श्री.नागोराव गाणार, श्री.प्रविण दरेकर : तारांकित प्रश्न क्रमांक ४२२७७ ला दिनांक १९ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील परळ विभागातील कॉलेज ऑफ फिजिशियन आणि सर्जन महाविद्यालयातून पदव्युत्तर पदविका उत्तीर्ण असल्याची खोटी प्रमाणपत्रे सादर करून ५८ डॉक्टरांनी नोंदणी केल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत महाराष्ट्र वैद्यकीय परिषदेने संबंधित पोलीस ठाण्यात तक्रार देऊनही त्यांच्यावर कोणत्याही प्रकारचे गुन्हे दाखल केले नसल्याची बाब निदशर्नास आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने खोटी प्रमाणपत्रे सादर करून नोंदणी करणाऱ्या बनावट डॉक्टरांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१९-११-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

सदर प्रकरणी ५७ डॉक्टरांनी खोटी प्रमाणपत्रे सादर केल्याची बाब निदर्शनास आली आहे.
(२) दिनांक १९/१०/२०१८ रोजी आग्रीपाडा पोलीस ठाण्यात ५७ डॉक्टर व डॉ. स्नेहल न्याती यांच्यावर गुन्हा क्र. २५३/२०१८ अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला आहे.
(३) सदर प्रकरणी महाराष्ट्र वैद्यकीय परिषदे तर्फे केलेल्या चौकशीच्या अनुषंगाने ५७ नोंदणीकृत वैद्यकीय व्यवसायिकांपैकी ५० (पन्नास) नोंदणीकृत वैद्यकीय व्यवसायिकांची नावे १ (एक) वर्षाकरीता व ७ (सात) नोंदणीकृत वैद्यकीय व्यवसायिकांचे नाव ५ (पाच) वर्षाकरीता परिषदेच्या नोंदणीपुस्तकातून काढून टाकण्यात आली आहेत. तसेच, त्यांना वैद्यकीय व्यवसाय करण्यास परिषदेकडून मज्जाव करण्याचे आदेश निर्गमित करण्याबाबतची कार्यवाही परिषदेच्यास्तरावर सुरु आहे. तसेच डॉ. स्नेहल ज्ञाती यांचे नाव परिषदेच्या नोंदणीपुस्तकातून कायमस्वरुपी काढून टाकण्यात आले.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील बेस्ट कर्मचाऱ्यांच्या निवासस्थानांची दुरवस्था झाल्याबाबत

**(४५) ४४५२४ (०१-११-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर, श्रीमती स्मिता वाघ, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील बेस्ट कर्मचाऱ्यांच्या निवासस्थानांकडे प्रशासनाचे दुर्लक्ष झाल्याने त्यांची दुरवस्था होवून ते धोकादायक ठरू लागल्यामुळे कर्मचाऱ्यांना जीव मुठीत घेऊन रहावे लागत असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बेस्ट उपक्रम तोट्यात असल्याने काटकसरीच्या उपाययोजना राबविण्यात येत असल्यामुळे उक्त वसाहतींमधील इमारतींच्या दुरुस्तीला विलंब होत असल्याचे निदर्शनास आले आहे, तसेच सदर कर्मचारी वसाहतीमधील रस्ते व पदपथांची ही दुरवस्था झाली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कर्मचाऱ्यांची निवासस्थाने दुरुस्त करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) बेस्ट कामगारांच्या घर दुरुस्तीचे १० कोटी कागदावरच अशा आशयाची बातमी दिनांक २५/१०/२०१८ रोजीच्या सामना या वृत्तपत्रात प्रसिध्द झाली होती ही वस्तुस्थिती आहे.

(२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिका हद्दीतील सर्व ३० वर्षांहून अधिक जुन्या इमारतींचे संरचनात्मक परिक्षण त्रयस्थ संस्थेकडून करुन घेणे व त्यानुसार आवश्यक त्या दुरुस्त्या करुन सदर संस्थेमार्फत इमारतीचे "स्ट्रक्चरल स्टॅबिलीटी सर्टिफिकेट" महानगरपालिकेस सादर करणे बंधनकारक करण्यात आले आहे.

यानुसार बेस्ट उपक्रमाच्या ३० वर्षांहून अधिक आयुर्मानाच्या इमारती तसेच अधिक धोकादायक इमारतींचे त्रयस्थ संस्थेकडून संरचनात्मक परिक्षण करुन घेण्यासाठी निविदा प्रक्रिया राबवून २ टप्प्यांत स्ट्रक्चरल ऑडिटर्सची

नेमणूक अनुक्रमे दिनांक २३/०१/२०१७ व दिनांक ६ नोव्हेंबर, २०१८ रोजी करण्यात आली आहे.

पहिल्या टप्प्यातील १६० इमारतींचे संरचनात्मक परिक्षण अहवाल बेस्ट उपक्रमास प्राप्त झाले असून, त्यानुसार सांताक्रुझ कर्मचारी वसाहतीतील तीन व मानखुर्द येथील दोन अतिधोकादायक इमारती अनुक्रमे दिनांक ३०/०८/२०१८ व दिनांक २४/१०/२०१८ रोजी निष्कासित करण्यात आल्या असल्याचे बेस्ट उपक्रमामार्फत कळविण्यात आले आहे.

पहिल्या टप्प्यातील १६० इमारतींच्या दुरुस्तीचा संरचनात्मक परिक्षकाने सादर केलेला अंदाजित खर्च रुपये ११३ कोटी इतका आहे.

तसेच, दुसऱ्या टप्प्यांतर्गत संरचनात्मक परिक्षकाची नेमणूक करण्याबाबतची कार्यवाही प्रगतीपथावर असून, त्याबाबतचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर इमारत दुरुस्ती खर्चाचा अंदाज घेण्यात येणार आहे.

बेस्ट उपक्रमाची आर्थिक स्थिती लक्षात घेता, बेस्ट उपक्रमाच्या कामगार वसाहती व इतर इमारतींच्या दुरुस्तीची कामे एकदम हाती घेणे शक्य होणार नाही. त्यामुळे काही कर्मचारी वसाहतीतील रस्ते व पदपथांची दुरवस्था झाली असली तरी सर्व कामगार वसाहती व इतर इमारतींच्या दुरुस्तीला अग्रक्रम देऊन त्यानुषंगाने उपाययोजना करण्यात येत असल्याचे बेस्ट प्रशासनामार्फत कळविण्यात आले आहे.

बेस्ट उपक्रमाच्या कामगार वसाहतींच्या दुरुस्तीकरीता बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पात रुपये १० कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिकेच्या आरोग्य विभागात प्रयोगशाळा तंत्रज्ञ व औषध निर्माता अशी पदे रिक्त असल्याबाबत

**(४६) ४४५३६ (०१-११-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिकेच्या अर्थसंकल्पात आरोग्य विभागासाठी भरमसाठ तरतूद करुनही प्रयोगशाळा तंत्रज्ञ व औषध निर्माता अशी एकूण २३४ पदे रिक्त असल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१८ च्या तिसऱ्या सप्ताहात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रयोगशाळा तंत्रज्ञ आणि औषध निर्माता ही दोन्ही रिक्त पदे त्वरित भरण्यासाठी मा.मुख्यमंत्री यांनी महानगरपालिका आयुक्त यांना पत्र लिहून संबंधितांना आदेश देण्याची मागणी केली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८)** : (१) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या कार्यकारी आरोग्य अधिकारी, प्रमुख वैद्यकीय अधिक्षक व खाते प्रमुख (माध्यमिक आरोग्य सेवा) यांच्या अखत्यारीतील प्रयोगशाळा तंत्रज्ञ व औषध निर्माता अशी एकूण १६८ पदे रिक्त असल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(२) याबाबतचे पत्र बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राप्त झाले नसल्याचे महानगरपालिकेने कळविले आहे.

(३) व (४) सदर प्रकरणी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात आली/येत आहे:-

- सदर १६८ रिक्त पदांपैकी प्रयोगशाळा तंत्रज्ञ यांची ९९ पदे रिक्त असून, त्याबाबतच्या त्रुटींची पूर्तता करुन सदर पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे.
- औषध निर्माता या संवर्गाच्या रिक्त ६९ पदांची पडताळणी अंतिम टप्प्यावर असून, सदर पदे त्वरित भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

---

## राज्यातील बढती मधील आरक्षणाच्या संदर्भात धोरणात्मक निर्णय घेण्याबाबत

**(४७) ४४५८८ (०२-११-२०१८). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती प्रवर्गातील अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या रोखण्यात आलेल्या पदोन्नती संदर्भात केंद्र शासनाने दिनांक १५ जून, २०१८ रोजी पदोन्नतीतील प्रक्रियेस दिलेली स्थगिती उठविल्याबाबतचे आदेश निर्गमित करुनही शासन सदरील बढतीमधील आरक्षण देण्यास विलंब करीत असल्याची बाब माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बढती मधील आरक्षणाच्या संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दिनांक २६ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या निकालात राज्य शासनांना बढती मधील आरक्षण देण्याची तरतूद आहे तसेच मागासलेपणा आणि योग्य प्रतिनिधित्व नसेल तर आरक्षण देता येईल असेही निकालात नमूद केले असून बढती मधील आरक्षणाबाबत शासनाचे धोरण काय आहे,

(३) असल्यास, मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांची रोखण्यात आलेली पदोन्नती तात्काळ सुरु करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-११-२०१८) :** (१) नाही. मा.सर्वोच्च न्यायालयाने विशेष अनुमती याचिका क्र.३०६२१/२०११ व क्र.३१२८८/२०१७ वर अनुक्रमे दिनांक १७/०५/२०१८ व दिनांक ५/०६/२०१८ रोजी दिलेल्या अंतरिम आदेशास अनुसरून, केंद्र शासनाने दिनांक १५/०६/२०१८ च्या कार्यालयीन ज्ञापनाद्वारे मा.सर्वोच्च न्यायालयाच्या सदर अंतरिम आदेशानुसार आवश्यक ती कार्यवाही करण्याचा सल्ला सर्व राज्य शासनांना दिला आहे. तथापि, याबाबत महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य यांनी मा.सर्वोच्च न्यायालयाने मा.उच्च

न्यायालय, मुंबई यांच्या दिनांक ४/०८/२०१७ आदेशास स्थगिती दिली नसल्यामुळे मा.उच्च न्यायालयाचे आदेश शासनावर बंधनकारक आहे. केंद्र शासनाच्या दिनांक १५/०६/२०१८ ज्ञापनान्वये मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाचे उल्लंघन करून पदोन्न्तीमध्ये आरक्षण देण्याचा अधिकार राज्य शासनास प्राप्त होत नाही, असा कायदेशिर सल्ला दिला आहे. त्यामुळे केंद्र शासनाच्या दिनांक १५/०६/२०१८ च्या ज्ञापनानुसार राज्यात पदोन्नतीमध्ये आरक्षण सुरू करता आलेले नाही.

(२), (३) व (४) एम.नागराज प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक १९/१०/२००६ रोजी दिलेल्या निर्णयाचा फेरविचार करण्याची आवश्यकता नाही, असा निर्णय मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २६/०९/२०१८ रोजी दिला आहे. तसेच अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती यांना पदोन्नतीमध्ये आरक्षण देण्यासाठी त्यांचे मागासलेपण सिध्द करण्याची आवश्यकता नाही, असे निकालात नमूद केले आहे. तथापि, मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २६/०९/२०१८ च्या निर्णयान्वये मा.उच्च न्यायालय,मुंबई यांचे दिनांक ४/०८/२०१७ चे आदेश रद्द केले नाहीत अथवा त्यास स्थगितीही दिलेली नाही.

राज्य शासनाने मा..उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दिनांक ४/०८/२०१७ च्या आदेशाविरूध्द मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेली विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ अद्याप प्रलंबित आहे. त्यावर मा.सर्वोच्च न्यायालयाचा अंतिम निर्णय झाल्यानंतर बढतीतील आरक्षणाबाबत शासनामार्फत योग्य तो निर्णय घेण्यात येईल.

---

## मुंबईतील पालिका रुग्णालयांत अपुऱ्या सुविधांमुळे रुग्णांची गैरसोय होत असल्याबाबत

**(४८) ४४५९१ (०१-११-२०१८). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.अमरिशभाई पटेल, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई शहरात झपाटयाने वाढणारी लोकसंख्या व बाहेरुन येणाऱ्या रुग्णांचा वाढता भार तसेच अपुऱ्या सोईसुविधांमुळे मुंबई महानगरपालिका रुग्णालयात

महत्वाच्या चाचण्या, शस्त्रक्रियेसाठी तीन-तीन महिने प्रतिक्षा करावी लागत असून वेळेत उपचार न झाल्याने रुग्ण दगावत असल्याच्या घटनेत वाढ होत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबई महानगरपालिका हद्दीत ३ प्रमुख रुग्णालये, १६ उपनगरीय रुग्णालये, प्रसुतीगृहे, आरोग्य केंद्रे असून मुंबई महानगरपालिका अर्थसंकल्पात तब्बल तीन हजार कोटी रुपयांची तरतूद करुनही पालिका रुग्णालयात सुविधांचा अभाव असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार शासनस्तरावरुन महानगरपालिका रुग्णालयामध्ये गरीब रुग्णांची होत असलेली गैरसोय दुर करण्याकरीता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) हे खरे नाही.

बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या ४ प्रमुख रुग्णालये, १६ उपनगरीय रुग्णालये व २८ प्रसुतीगृहांमध्ये माहे जानेवारी, २०१७ ते ऑक्टोंबर, २०१८ या कालावधीत एकूण ३,४९,७९४ शस्त्रक्रिया करण्यात आल्या आहेत.

नियोजित शस्त्रक्रियांसाठी रुग्णांवर त्यांच्या आजाराच्या गंभीरतेनुसार २ ते ६ आठवड्यांच्या कालावधीमध्ये शस्त्रक्रिया करण्यात येते ही वस्तुस्थिती आहे. तथापि, अपघातग्रस्त व गंभीर रुग्णांना प्रथम प्राधान्य देऊन शस्त्रक्रिया करण्यात येतात.

(२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या आरोग्य विभागासाठी महानगरपालिकेच्या सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पात रुपये ३६०२ कोटी इतक्या रकमेची तरतूद करण्यात आली आहे.

बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या विविध रुग्णालयांमध्ये खालीलप्रमाणे सुविधा उपलब्ध आहेत :-

- एम.आर.आय., सीटी स्कॅन, पॅट स्कॅन, सोनोग्राफी, डायलिसिस विभाग, डी.एस.ए. चाचणी.
- पक्षघाताच्या रुग्णांसाठी २४X७ उपचार केंद्र.

- प्रमुख रुग्णालयातील तज्ञ डॉक्टरांकडून टेलिमेडीसिन विभागामार्फत मुंबई, मुंबई बाहेरील डॉक्टरांना सल्ला देणे.
- अवयव प्रत्यारोणाबाबतच्या नियमनाचे कामकाजासाठी रोटा (ROTTO) विभाग.
- विविध प्रकारच्या रक्ताच्या व इतर चाचण्याबाबतच्या सोयी-सुविधा.
- नायर दंत रुग्णालयामार्फत दंतरोगावरील विशेष व अतिविशेष उपचार व सुविधा.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कर्जत (जि.रायगड) तालुक्यातील आदिवासी लोकांच्या मागण्या पूर्ण करण्याबाबत

**(४९) ४४६१६ (३१-१०-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कर्जत (जि.रायगड) तालुक्यातील आदिवासी लोकांनी स्वस्त धान्य धोरणाच्या विरोधात कर्जत तहसिल कार्यालयावर माहे सप्टेंबर, २०१८ च्या तिसऱ्या आठवड्यात मोर्चा काढला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, स्वस्त धान्य वाटपात होणारा असमतोल, आधार कार्ड लिंक करण्याची सक्ती, अंत्योदय रेशनकार्ड रद्द केल्याने होणारी उपासमार तसेच स्वस्त धान्य दुकानात साखर व ५ लिटर रॉकेल देण्यात यावे, अंत्योदय योजनेच्या लाभार्थ्यांना ३५ किलो धान्य देण्यात यावे आदी महत्वाच्या मागण्या मोर्चेकरांनी केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कर्जत तालुक्यातील आदिवासी लोकांच्या मागण्या पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१९-११-२०१८) :** (१) जागृत कष्टकरी संघटना, रायगड यांनी दिनांक २१ सप्टेंबर, २०१८ रोजी तहसिलदार कर्जत यांच्याकडे मागण्याबाबतचे निवेदन दिले आहे.

(२) हे खरे आहे.

(३) राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेंतर्गत अंत्योदय योजनेच्या लाभार्थ्यांना प्रतिमाह प्रति शिधापत्रिका ३५ किलो अन्नधान्य तर प्राधान्य कुटुंब लाभार्थ्यांना प्रति माह प्रति व्यक्ती ५ किलो अन्नधान्य वितरीत करण्यात येते. तसेच बिगर गॅसजोडणी शिधापत्रिकाधारकांना किमान २ ते कमाल ४ लिटर केरोसिन वितरीत करण्यात येते.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे डोंगरकडा (ता.कळमनुरी, जि.हिंगोली) येथील ग्रामपंचायत कार्यालयातील कर्मचाऱ्यांनी गैरव्यवहार केल्याबाबत

**(५०) ४६२३१ (०३-११-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे डोंगरकडा (ता.कळमनुरी, जि.हिंगोली) येथील ग्रामपंचायत कार्यालयातील कर्मचाऱ्यांनी प्रपत्र नमुना क्र. ८ मध्ये खाडाखोड करुन माहे सप्टेंबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान सुमारे १५० घरे स्वत:च्या नावावर करुन गैरव्यवहार केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात विधीमंडळाच्या दोन्ही सभागृहात सन २०१५ पासून सतत आश्वासने देवूनही संबंधित दोषींवर कारवाई तसेच लाभार्थ्यांना घरे देण्याबाबत कार्यवाही झालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन या गैरव्यवहारातील दोषींवर कारवाई करुन मूळ लाभार्थ्यांना घरे देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-११-२०१८) :** (१) होय. हे अंशत: खरे आहे.

मौजे डोंगरकडा ग्रामपंचायत कार्यालयातील सन १९९३-९४ च्या नमुना नं. ८ मध्ये खाडाखोड झाल्याचे अभिलेख्यावरुन आढळून आले आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांच्या दिनांक १२/०३/२००३ च्या आदेशान्वये सदरच्या चुकीच्या नोंदीची दुरुस्ती करण्यात आली आहे. सन २००२-०३ च्या करआकारणी नोंदवहीमध्ये नोंद असलेल्या १२९ मालमत्ता धारकांची नांवे सन २००६-०७ मध्ये फेर आकारणी करण्यात आलेल्या नोंदवहीमध्ये आढळून आलेली नाही.

(२) हे खरे नाही. चौकशी करुन संबंधितांवर कारवाई करण्यात आलेली आहे.

(३) सदर प्रकरणात चौकशी करुन पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात आलेली आहे

अ) तत्कालीन ग्रामसेवक श्री.आर.एल. आडे यांना दिनांक १६/०५/२००२ च्या आदेशान्वये व तत्कालीन ग्रामसेवक श्री.बी.जी. पोपलाईत यांना दिनांक २६/१०/२०१६ च्या आदेशान्वये व श्री.बि.आर. भोसले यांना दिनांक १५/११/२०१६ च्या आदेशान्वये निलंबित करण्यात आले. विभागीय चौकशीअंती श्री.पोपलाईत यांची एक वार्षिक वेतनवाढ व श्री.भोसले यांच्या दोन वार्षिक वेतन वाढी बंद करण्याबाबतची शिक्षा बजावण्यात आली आहे. तसेच तत्कालीन ग्रामविकास अधिकारी श्री.ए.एन.रावळे यांचेविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही प्रस्तावित करण्यात आली आहे.

ब) श्री.ना.ना. सारंगे सरपंच यांचेविरुध्द महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमाच्या कलम ३९(१) नुसार प्रस्तावित करण्यात आलेल्या कार्यवाहीबाबत अपर आयुक्त, औरंगाबाद यांनी दिनांक २९/०९/२०१८ च्या निर्णयान्वये संबंधित सरपंच यांचेविरुध्द कार्यवाही करण्याची आवश्यकता नाही असा निर्णय दिला आहे.

क) ग्रामपंचायत डोंगरकडा यांना भूमी अभिलेख कार्यालयाकडून सर्व ले-आऊट, नगर भूमापन नकाशे व आखीव पत्रिका या अभिलेख्याच्या आधारे फेर आकारणी करुन घराची मालकी निश्चित करुन अद्ययावत नमुना नं. ८ करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.